॥ ॐ ॥

श्री सद्‌गुरू समर्थ

# नित्यनेमावली



एप्रिल १९८७ किंमत ४ रुपये

# अकॅडेमी ऑफ कंपेरेटिव्ह फिलॉसॉफी अॅन्ड रिलीजन
## बेळगांव.





॥ ॐ ॥

श्री सद्‌गुरू समर्थ

# नित्यनेमावली



१९८७ किमत : ४ रुपये



प्रकाशक :– श्री दि भा परुळेंकर
सेक्रेटरी अकॅडेमी ऑफ कंपेरेटिव्ह
फिलॉसफी अ‍ॅन्ड रिलिजन
गुरूदेव मंदिर – हिंदवाडी
बेळगांव-५९० ०११



आवृती :– बारावी
प्रती :– २००० ( १९८७ )

❋

मुद्रक :– विक्रांत प्रिंटर्स
हिंदवाडी–बेळगाव

# अनुक्रमणिका

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.



प्रस्तुत पुस्तकांत श्रीभाऊरावमहाराज उमदीकर यांच्या सांप्रदायांत प्रचलित असलेला भजनक्रम दिला आहे. प्रथम रात्री म्हणणेचें भजन व नंतर काकडआरती अशी योजना केली आहे. काकडआरतीनंतर "पंचसमासी" नामक एक पांच समासांचें प्रकरण, त्यांच्या शिष्यांपैकीं गणपति पवार नामक एका सोळा वर्षाच्या मुलाने केलेले, दिलें आहे. नंतर त्यांच्या शिष्यवर्गींपैकीं मंडळीनीं केलेलीं चारच पदें दिलीं आहेत. प्रस्तुत पुस्तक सांप्रदायांतील मंडळीसच विशेषेंकरून उपयोगी पडण्याजोगें आहे. बहुजनसमाजास सर्व दृष्टींनीं पसंत पडेल अशा प्रकारचें एक बिस्तृत पुस्तक करण्याचा विचार होता; परंतु कांहीं कारणामुळें तो लांबणीवर टाकणें भाग पडलें. सदर पुस्तक प्रसिद्ध करण्याचा योग जुळून आल्यास त्यांत पुष्कळ चांगला मजकूर येण्याजोगा आहे. प्रस्तुत पुस्तकांची किंमत थोडी ठेवणें जरूर असल्यानें भजनांतील पुष्कळ आरत्या, अष्टकें, भारुडें गाळावीं लागलीं आहेत. हा सर्व मजकूर व शिवाय महाराजांच्या संग्रहीं असलेल्या असंख्य अनुभविक पदांचा व अभंगांचा सांठा व तसेंच महाराजांनीं पाठविलेलीं कांहीं महत्त्वाचीं पत्रें, तसेंच सांप्रदायाचा समूळ इतिहास, महाराजांचें विस्तृत चरित्र इत्यादि मजकूर पुढील पुस्तकावर लोटणें जरूर आहे. शिवाय त्यांच्या

शिष्यांनीं केलेलीं पुष्कळच पदें आहेत, तीं सर्व पुढील पुस्तकांतच घालणें जरूर आहे. हा योग केव्हां जुळून येईल तेव्हां येवो! तूर्त पूर्णचंद्राचा आल्हाद चंद्रकलेंतच मानून घेणें भाग आहे.

श्रीभाऊरावमहाराज यांची परंपरा रेवणनाथ (ज्यांस रेवण-सिद्ध असेंही म्हणतात) यांपासून आली आहे. नवनाथांचीं नांवें एका संस्कृत श्लोकांत दिलीं आहेत, तो श्लोक असा :—

गोरक्षजालंदरचर्पटाश्च । अड्भंगकानीफमछिंदराद्याः ।
चौरंगिरेवाण च भर्तृसंज्ञा । भूम्यां बभूवुर्नवनाथसिद्धा ।। ४ ।।

संस्कृतज्ञ लोकांस या श्लोकांत कांहीं दोष आढळतील; परंतु श्लोककर्त्याचा उद्देश नवनाथांचीं नांवें एकत्र ग्रथित करणें एवढाच असल्यानें त्यांतील दोष पाहणें इष्ट होणार नाहीं. असो. "नवनाथ-भक्तिसार" नामक ग्रंथांत रेवणसिद्धाचे चरित्र ३४, ३५, ३६ या अध्यायांत दिलें आहे रेवणनाथ हें नांव पडण्याचें कारण असें दिलें आहे :—

पूर्वी अठ्यायंशीं सहस्र ऋषी । जाले आहेत विधिवीर्यासी । त्याच समयीं रेत महीसी । रेवातीरीं पडियेले ।। १७ ।। रेवातीरीं तेही रेवेंत । रेत पडलें अकस्मात । चमस नारायण संचार करोनी त्यांत । देहधारी मिरवला ।। १८ ।।

रेवणनाथ कृषिकर्म करीत असतां त्यास श्रीदत्ताची भेट कशी झाली, दत्तांनीं पूर्ण अनुग्रह न करतां केवळ महिमासिद्धि कशी दिली,

त्या सिद्धीच्या योगानें रेवणनाथांनी चमत्कार कसे केंले, पुढें मत्स्येंद्र नाथांचे तेथें आगमन होऊन, त्यांस आठही सिद्धि वश असल्यानें रेंवणनाथांची मानहानि कशी झाली, दत्तांचा पूर्ण अनुग्रह मिळविण्याबद्दल त्यांनीं नंतर कशी खटपट केली, मत्स्येंद्रनाथांनीं गिरिनारीं जाऊन श्रीदत्तांस तेथें कसें आणलें, नंतर श्रीदत्तांनी रेवणनाथांस आत्मज्ञानपारंगत करुन सर्व विद्या व सर्व कलां कशां मिळवून दिल्या, याचें सुरस वर्णन " नवनाथ–भक्तिसार" अध्याय ३५ यांत दिलें आहे तें जिज्ञासूंनीं पहावें.

या पुढचा रेवणनाथचरित्राचा उपयोगी भाग " सिद्धांतसार" नामक ग्रंथांत सांपडतो. रेवणनाथांचे मरुळसिद्ध नामें अनुगृहीत होते. करवीरक्षेत्रीं सिद्ध पुरुषांशीं विरोध करणारी माई या नांवाची एक स्त्री होती. तिनें आपल्या पणानें कित्येक सिद्धांस बंदिशाळेंत घातलें होतें मरुळसिद्ध अचानक तेथें प्रगट होऊन त्यांनीं तिचा पण जिकला, पण माईची पूर्ण " भ्रांति फेडण्याबद्दल " त्यांस गुरुंची आज्ञा नसल्यानें ते गुरूकडे गेले व त्यांस करवीरास येण्याबद्दल प्रार्थना केली. रेवणनाथांनीं विनंति मान्य केली; वाटेंत रेवणगिरी पर्वतावर विश्रांती घेतली, व करवीरास येंऊन माईचें सर्वविष प्राशन करून तिचा पण हरण केला व ती शरण आल्यावरून तिची एक किनरी बनविली. ती ते नेहमीं वाजवीत असत तसें म्हणतात.

( ३ )

उठोनिया प्रात:काळीं । वेगें जाऊ राउळासी ।
जळतिल पातकांच्या राशी । काकडआरती देखिल्या ॥१॥
उठा उठा हो साधुजन । साधा आपुलालें हित ।
गेला गेला नरदेह । मग कैंचा भगवंत ॥२॥
उठोनिया पहाटे । विठोबा पाहूं बा नीट ।
चरण तयाचे अमोलिक । अवलोकूं दृष्टीं या ॥३॥
जागे करा रुक्मिणीवरा । देव निजले निजमंदिरां ।
वेगीं निंबलोण करा । दृष्ट होईल तयासी ॥४॥
ढोल दमामें गर्जतीं । पुढें वाजंत्री वाजती ।
काकडआरती होते । पांडुरंगरायाची ॥५॥
सिंहशंखनादभेरो । गजर होतो महाद्वारीं ।
केशवराज विटेवरी। नामा चरणीं वंदितो ॥६॥

( ४ )

गुरु हा संतकुळींचा राजा । गुरु हा प्राणविसांवा माझा ।
गुरुवीण देव नाहीं दुजा । पाहतां त्रिलोकीं ॥१॥
गुरु हा सुखाचा सागर । गुरु हा प्रेमाचा आगर ।
गुरु हा धैर्याचा डोंगर । कदा काळीं डळमळेना ॥२॥
गुरु हा सत्यालागीं साह्य । गुरु हा साधकासी माय ।
गुरु हा कामधेनु गाय । भक्ता घरीं दुभतसे ॥३॥

गुरु हा भक्तीचें मंडण । गुरु हा देहासी दंडण ।
गुरु हा पापाचें खंडण । नानापरी वारितसे ॥४॥
गुरु हा वैराग्याचें मूळ । गुरु हा परब्रह्म केवळ ।
गुरु हा सोडवी तात्काळ । गांठी लिंगदेहाच्या ॥५॥
गुरु हा घाली ज्ञानांजन । गुरु हा दाखवी निजधन ।
गुरु हा सौभाग्य देऊन । स्वात्मबोध नांदवी ॥६॥
काया काशी गुरु उपदेशी । तारक मंत्र दिला आम्हांसी ।
बापरखुमादेवीवरासी । ध्यान मानसीं लागलें ॥७॥

( ५ )

फळलें भाग्य माझें । धन्य झालों संसारीं ।
सद्गुरु भेटले हो । त्यानीं धरियेलें करीं ।
पश्चिमे चालवीलें । आत्मा तेथें निर्धारी ।
त्रिकुटावरी नांदे । देखियेली पंढरी ॥१॥
तें सुख काय सांगूं । वाचे बोलता नये ।
आरतीचेनि योगें । गेलें मीपण माये ॥ ध्रु०॥
राउळामाजीं जातां । राहे देह-अवस्था ।
मन हें उन्मत झालें । नसे बद्धतेची वार्ता ।
हेंतु हा मावळला । शद्धा आली निःशद्धता ।
तटस्थ होउनि ठेलें । निजरूप पाहतां ॥२॥

त्रिगुण गुण बाई । पूर्ण उजळल्या वाती ।
नवलाव अविनाश । न जाये स्वयंज्योती ।
लावितां लक्ष तेथें । हालूं विसरलीं पातीं ।
नातुडे मन माझें । न कळे दिवसराती ॥३॥

आरती विठ्ठलाची । पूर्ण उजळली अंतरीं ।
प्रकाश थोर झाला । सांठवेना अंबरीं ।
रविशशि मावळले । तया तेजामाझारीं ।
वाजतीं दिव्यवाद्यें । अनहत गजरीं ॥४॥

आनंदसागरांत । प्रेमें बुडी दिधली ।
लाधलें सौख्य मोठें । नये बोलतां बोलीं
सद्‌गुरूचेनि संगें । ऐसी आरती केली ।
निवृत्ति आनंदांत । तेथें वृत्ति निमाली ॥५॥

विठ्ठल, विठ्ठल, विठ्ठल, विठ्ठल, विठ्ठल, !!!
पुंडलीक वरदा हरि विठ्ठल !!



## प्रार्थना

(१)

याचेऽहं करूणासिन्धो यादज्जीवमिदं तव ।
अदैन्यं देहदाढर्यं च त्वत्पादाम्बुजसद्मतिम् ।।१।।
अनाद्यनन्तकालेषु भृत्योऽहं त्वां हि मे प्रभो ।
त्वं तुष्टो वाऽथ रुष्टो वा त्वां विना मे गतिर्नहि ।।२।।
तुष्टोऽसि त्वं दयासिन्धो किमन्यैर्मम रक्षणे ॥
रुष्टोऽसि त्वं दयासिन्धो किमन्यैर्मम रक्षणे ।।।३।।
दोषाणां च सहिष्णुत्वे त्वत्समो नास्ति भूतले ।
मत्समो नहि देवेश कृतघ्नो वञ्चकोऽपि वा ।।४।।
ईशस्यखिलवीर्यस्य किमसाध्यं वदाच्युत ।
ममेष्टं च कियन्मात्रं किमेतावद्विलम्बनम् ।।५।।
जगत्स्वामी कृपापूर्णः सम्भवेन्निर्दयापरः ।
का तदा गतिरस्माकं गरदायां स्वमातरि ।।६।।
त्वमेवैको जगत्त्राता दाता ज्ञाता दयान्वितः ।
त्वां विना कः पुमान् कर्ता ह्यस्माकं तु मनोरथम् ।।७।।
आर्तबन्धुरिति ज्ञात्वा त्वामहं शरणं गतः ।
रक्षमामथवा सम्यक् त्वं यशो मुञ्च शाश्वतम् ।।८।।
दीनबन्धो दयासिन्धो सुहृद्बन्धो जगत्पते ।
संसारार्णवमग्नं मां कारुण्येन समुद्धर ॥९।।

निर्गुणेष्वपि सर्वेषु दयां कुर्वन्ति साधवः ।
नहि संहरते ज्योत्स्ना चन्द्रश्चाण्डालवेश्मनि ॥१०॥
प्रसीद मे श्रियः कान्त सुप्रसीद दयानिधे ।
पुनः पुनः प्रसीद त्वं प्रसीद वरदो भव ॥११॥

(२)

तापत्रयें हा बहु गांजलो मी । बुद्धि स्थिरावे नच
शीघ्र रामी ।। मनें वोढिलों सर्वदा कामपाशीं ।
गुरो कृपाळो धरि शीघ्र हातीं ॥१॥
विपत्ती असो सर्वदा कुंति मागे । हरीचें जरीं
सर्वदा ध्यान लागे ।। सुटेना कदा भोगल्यावीण
भोग । परी सर्वदा नाम इच्छी अभंग ।।२।
मनीं प्रेरणा थोर आतां करावी । सदा वस्तुनें
दृष्टि तुम्ही भरावी ।। शरीरीं सदा नेम हा
वाढवावा । सदा बुद्धिला ज्ञानयोगींच ठेंवा ॥३॥
सदा संतसंगी रमो चित्त माझे । सदा तत्पदीं
वास माझा असो दे ।। कधीं दाविसी आमुची
पंढरी ही । भरे मानसी सर्वदा । इंचगेरी ।।३।।
संसारतापे बहु तापलों पहा । निवृत्तिमार्गें मज
शीध्र चालवा ॥ नसे दुसरा रक्षिता कोण मातें ।
कृपा पूर्ण दासानुदासा असों दे ॥५॥

# सकाळचें भजन

गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा । मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।
नमो शारदा मूळ चत्वारि वाचा । गमो पंथ आनंत या राघवाचा ॥१॥

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् ॥ २ ॥
श्रूयतां देव देवेश नारायण जगत्पते ।
त्वदीयनामध्यानेन कथयिष्ये शुभाः कथाः ॥ ३ ॥
ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् ।
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम् ।
भावातीतं त्रिगुणरहितं सद्‌गुरुं तं नमामि ॥ ४ ॥

## (२)

सद्‌गुरुनाथ माझे आई । मला ठाव द्यावा पायीं ॥ (२ वेळ)
मला ठाव द्यावा पायीं । (२ वेळ)
सद्‌गुरुनाथ माझे आई । मला ठाव द्यावा पायीं ॥ (२ वेळ)

## (३)

पहिलें पाहतां श्रीमुख । तहान हरपली भूक ॥ १ ॥
पहा पहा डाळेभरी । मूर्ति सांवळी गोजिरी ॥ २ ॥
रवि शशि ज्याच्या कळा । तो हा मदनाचा पुतळा ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्णू काय । घेतो अलाया बलाया ॥ ४ ॥

महाराजांच्या मुख्य मुख्य शिष्यांचें वर्णन समास ४ मध्यें आहे. पांचव्या समासांत ग्रंथकर्त्यानें विविध विषयांचें विवरण केलें आहे.

कोणत्याही मोठ्या पुरुषाची योग्यता त्यांजवळ पुष्कळ दिवस सतत राहिल्यावांचून कळत नाहीं. त्याचप्रमाणें श्रीभाऊरावमहाराज यांची योग्यता थोडीबहुत तरी कळण्यास त्यांजवळ पुष्कळ दिवस राहून त्यांच्या प्रत्येक क्रियेचें अवलोकन केलें पाहिजे. त्यांची पूर्ण योग्यता कळण्यास प्रत्यक्ष त्याप्रमाणेंच झालें पाहिजे :—"तुका म्हण अंगे व्हावें ते आपण । तरीच महिमान येईल कळो ॥" हें शक्य नसल्यानें त्यांची थोडीबहुत तरी योग्यता त्यांच्याशीं सहवास केल्यानेंच कळणार आहे. प्रस्तुत लेखकास अलीकडे बरेच दिवस त्यांजबरोबर रहाण्याचा प्रसंग आला होता; व त्यांच्या प्रत्येक क्रियेचें त्यानें सूक्ष्म अवलोकन केलें आहे. त्यांची निःस्पृहता, त्यांचें दयाळुत्व, त्यांचा नेमस्तपणा, त्यांचा दृढतर मनोनिग्रह, आबालवृद्धांशीं समता, शिष्यांवर अलोट प्रेम, गुरूंवर व आत्मज्ञानावर निःसीम भक्ति, अलौकिक शांति व उपाधीपासून अलिप्त राहण्याची शैली, हे व इतर अनेक गुण वरवर पाहणारांस सुद्धां दिसून येतील. फार काय सांगावें? दासबोधांतर्गत निःस्पृह वर्तणूक (११-१०) निःस्पृहलक्षण (१४-१), निःस्पृहव्यापलक्षण (१५-२) वगैरे जे आचारबोधक समास आहेत, त्यांतील प्रत्येक ओवीप्रमाणें त्यांनीं आपलें वर्तन ठेविलें आहे !

## ( ८ )

कृपाळू सज्जन तुम्हीं संतजन । हेचि कृपादान द्यावें मज ॥१॥
आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा । देवा माझी सांगा काकुळती ॥२॥
अनाथ अपराधी पतित आगळा । परि पायांवेगळां नका करूं ॥३॥
तुका म्हणे तुम्हीं निरविल्यावरी । मग मज हरी उपेक्षीना ॥४॥

## ( ९ )

नाम वाचे श्रवणीं कीर्ति । पाउलें चित्तीं समान ॥१॥
काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल ॥२॥
कीर्तनाचा समारंभ । निर्द्वंद्व सर्वदा ॥३॥
निळा म्हणे स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनाम ॥४॥

## (१०)

आम्ही वैकुंठवासी । आलों याची कारणासी ।
बोलिले जे ऋषि । साच भावें वर्ताया ॥१॥
झाडूं संतांचें मारग । आडरानीं भरलें जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥२॥
अर्थ लोपलीं पुराणें । नाश केला शद्बज्ञानें ।
विषयलोभीं मनें । साधनें बुडविलीं ॥३॥
पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ।
तुका म्हणे करा । जयजयकार आनंतें

# दुपारचे भजन

## भाग १.

नाम भजे गुरुनाम भजे हरनाम भजे
शिवनाम भजे ।।प।।
कहो कहो जी गुरुभजनका कर्णरंध्र मेरे सुनता है ।
नव दरवाजे बद किये तो दशविध नाद बजता है ।।१।।
अजब बजाया मोलि देखो सदाशिव को सुनता है ।
आदि पूरसे फेरे फिरसे सहस्त्रारपर नाद बजता है ।।२।।
एक अक्षरका मार्ग जानिला दुसरे उसमें न्यारा है ।
दो अक्षरका मार्ग मिले तो फियने न्यारा होता है ।।३।।
तीन अक्षरका मार्ग जानिला तीन मूर्तिका होता है ।
नादबिंदुकल एक बना तो दुनिया डुबकर पिचडे है ।।४।।
चिंता करकर देखो दिलपर तीनगुणमे न्यारा है ।
पंचलिंग जब एक बन तो आत्मक ब्रह्म बजाता है ।।५।।
शिवानगरपर शंकर मुनशी सिद्धासनपर बैठे है ।
माया शंकरि तीन गुणमे मदरस जपतो पिचडे है ।।६।।
चिदानंदगुरु ब्रह्म कृपासे बोधसार मैं बोलत है ।
अंतरंगसे मार्ग जानिला लिंगसंग जप होता है ।।७।।

(२)

सहज माडो माडो गुरुभजनी ।
साधुसंतर चरणव पिडिनी ॥पल्ल॥
तनु मन धनवु तन्नदल्ल ।
नेनवीन बायीगे नेच्चिकिल्ल ॥
घन गुरुविन पादव पिडि नी ।
अनुमानव्यातको माडो स्मरणी ॥ १ ॥
आग ईग यावाग स्थिरविल्ल ।
सागि मागि पोगुदु गळिगेल्ल ॥
भोग भाग्यद भ्रमेयनु कळे नी ।
योगियागि माडो नी मनरंजनी ॥२॥
जातिगोत्रनीतिगे तिळियलिल्ल ।
मातुमातीनोळगे होयितेल्ल ।
सत्यबोध गुरुविन पादव पिडी नी ।
सत्य चिदानंदन माडो स्मरणी ॥३॥

(३)

परमहंस प्रकाशगे मंगल । परंज्योति परब्रह्मगे मंगल ॥पल्ल॥
नित्य निरंजन निर्विकारगे मंगल ।
सत्य साधुर सहकारगे मंगल ।
मिथ्यामाया अळिदातागे मंगल ।

मुक्ति कोडुवंथ कर्तागे मंगल ॥१॥
भेदाभेद अळिदातगे मंगल ।
भेदके निलुकद अगणितगे मंगल ।
मेदिनियोळगे जगभरितगे मंगल ।
वादीजनर संहर्तागें मंगल ॥२॥
इंदुधर विश्वनाथगे मंगल ।
बंदु लोकापुरदल्लि नितातगे मंगल ।
तंदे त्रिमल्ल अनंतगें मंगल ।
कंद ज्ञानदेवर दातागे मंगल ॥३॥

(४)

श्रीगुरुनाथं छंदननाथं । निर्गुणरूप सदोदितशांतम् ॥
श्रीगुरुसहजानंद महेशं ।
निर्मळनिश्चळशुद्धपरेशम् ॥
बोधितबोधपरंपरबोधं ।
सच्चित्सुखअद्वैतविचारम् ॥
ज्ञानेश्वरगुरुसर्वं भरितं
तारय तारय महागुरुनाथम्
प्रेमळनिश्चळनिरामयरूपम् ॥
निर्मलतारकपूर्णप्रतापम् ॥

(५)

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा । बुध्यात्मना वा प्रकृतिस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकलं परस्मै । नारायणायेति समर्पयामि ।।
अच्युतं केशवं रामनारायणं । कृष्ण दामोदरं वासुदेवं भजे ।।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं । जानकीनायकं रामचंद्रं भजे ।।

(६)

हरिनारायण दुरितनिवारण । परमानंदसदाशिवशंकर ।।
भक्तजनप्रिय पंकजलोचन । नारायण तव दासोऽहम् ।।
हरिनारायण गुरुनारायण । घडि घडि जिव्हे करि
पारायण ( असे ३ वेळा )

# दुपारचे भजन

भाग २

## प्रदक्षिणा

धन्य हो प्रदक्षिणा सद्‌गुरुरायाची ।
धन्य धन्य हो प्रदक्षिणा श्रीगुरुरायाची ।
झाली त्वरा सुरवरां विमान उतरायाची ॥ धृ० ॥
पदोपदी घडल्या अपार पुण्याच्या राशी ।
सकळहि तीर्थें घडलीं आम्हां आदिकरुनि काशी ।।
कोटि ब्रह्महत्या हरती करितां दंडवत ।

लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायांत ॥२॥
मृदंग टाळ घोळ भक्त भावार्थे गाती ।
नामसंकीर्तनीं नित्यानंदे नाचती ॥३॥
गुरुभजनाचा महिमा न कळे निगमां आगमांसी ।
अनुभव जे जाणती ते गुरुपदिचे अभिलाषी ॥४॥
प्रदक्षिणा करुनी देह भावें वाहिला ।
श्रीरंगात्मज विठ्ठल पुढें उभा राहिला ॥५॥

(२)

अलक्ष्य लक्षुनि पाहे निजवस्तु । परात्पर चिन्मय ब्रह्मरुप तेज प्रत्यक्ष आहे ॥ गुरुपद वंदुनि आधि पाहि तूं । हृदयांतरि शोधुनि मनातें घूर्त करी बोधुनी ॥ कामक्रोध मदमत्सर अंगीं । दंभाहंकार जिरवुनी द्वैत-कल्पनामार त्यागुनि ॥ एकाग्रे मन स्वस्थ करोनि । बैस पद्मासनीं मुद्रा लाव आत्मभाषणीं ॥ दृष्टीं आंत दृष्टि सुरंग । करूनियां समदृष्टि मग । नाना तऱ्हेचे रंग सुरंग । रक्त श्वेतवत आहे । पुढें नीलवर्ण तेज जाणावें ॥१॥ नीलवर्ण तें बिंबकाशीं । चैतन्याची मुस त्यामध्यें वस्तु जडली असे ॥ त्रिकुट भेदुनी उलट जातां । मीन मार्गे धसे रूप अरूप होउनी प्रवेश ॥ उन्मन होऊनिया ब्रह्मरंध्रीं । समाधि लावुनि बसे

तेथें काळ कदा न धजे ॥ सिद्ध पुरुष तो योग साधुनि ।
तापा स्तवितो करून हरण । आपुला आपण राहे
निमग्न । त्यालाचि प्राप्ति होय चराचर अवघेंचि
ब्रह्म आहे ॥२॥ सद्‌गुरूकृपा जखमचि वारी । ज्याला
घाव लागेल तोचि घायाळगती घुमतो ॥ बीजमंत्र हा
जप गायत्री । अष्टोप्रहार योजितो साधन घडि पळ
घडि साधितो ॥ अहंभावे मीपण तनधन । गुरुचरणीं
अर्पितो तो हा मूळ पिरया इच्छितो । अखंड तन्मय
त्यात लुब्धुनि । निजवस्तु लक्षितो लोचनीं । निरपेक्ष
तो निर्मळ प्राणी । जगांत वेडा राहे अंतरीं ज्ञानबोध-
रस पिये ॥३ सद्‌गुरुकृपा उत्तम ज्यासी । सहज
हातासी आली त्याला निजवस्तु लाधली ॥ पाहातां
पाहतां आत्मज्योत ही । वैराग्यें पाजळली चिन्मय वस्तु
डळमळली ॥ शाहालिंग संतप्रमाण । धन्य गुरुमाउली
आनंदे हरिवर कृपा केली ॥ कवनकटाक्षें करि
सिद्धांत । गणपति भीमसेन गातो सभेंत । गुरुपुत्र तो
ज्ञानवंत । ऐंकुनि तल्लिन होये लुंगरा व्यर्थ बावटी
राहे ॥४॥

( ३ )

काय सांगू या समर्थाची थोरी ।
भजकासी आपणाऐसा करी ।। ध्रु० ।।
सद्‌गुरुराजा तन्मय छत्रपति ।
भज करूनी सेवे अधिपति ।
सोऽहं शद्ब सनद देउनि हातीं ।
शिरीं हात ठेविला मूद्रांकित ।। १॥
अहंकाराचे दुर्ग आवरिले ।
तयावरी मजला पाठवीलें ।
पूर्वद्वारें त्रिकुट देखीयेलें ।
रजोदृष्टी ब्रह्मयासी जिंकीयेलें ।।२।।
तेथुनि ऊर्ध्वपंथें पश्चिममार्ग पाहे ।
सत्वगुणीं श्रीहाटीं विष्णु आहे ।
तया वळंघोनी वरुता जाय ।
तमोगोल्हाटीं रुद्र दिसता हें ।।३।।
ज्ञानशास्त्र घेऊनिया हातीं ।
केली तमो-अज्ञानाची शांतीं ।
पुण्यगिरी तेथुनि देखे पुढती ।
शुद्ध अधिष्ठानीं विश्वमूर्ती ॥४।।
उना राहोनि तया गिरीवरी ।

देखे भ्रमरगुंफा गडद ओवरी ।
ओटपीठावरुती शोभे बरी ।
परमानंद आहे तया घरीं ॥५॥
बोधबळिया प्रवेशलों तेथ ।
अहंकार झाला वाताहत ।
विजयदुंदभि वाजति अनुहत ।
ब्रह्मदृष्टींत पावलों निजविश्रांत ॥६॥
भक्तिनिशाण चढविलें वरी ।
जें कां ब्रह्म भासत चराचरीं ।
रामनामें गर्जती जयजयकारीं ।
दासपण न उरे तेथें उरी ॥७॥

(४)

सखया रामा विश्रांति तुझे नामी ।
म्हणउनि मजला ने त्वरें निजसुखधामीं ॥धृ॥
अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी ।
पशु-सुत-जाया-धन-धामीं प्रीती मोठी
माझीं माझीं म्हणुनि म्या धरिलीं पोटीं ।
यांच्या संगें भोगिल्या दुःख-कोटी ॥१॥
सोडुनि स्वहिता धावलों दिशा दाही ।
शववत झालों मागुता कौतुक पाही ।

परि खळजन हे नेदिती कवढी ते ही ।
परि ही आशा पापिणी लाजत नाहीं ॥२॥
जंववरी दृढता तंववरी या तनुची प्रीती ।
जर्जर झालीया अवघेचि निंदक होती ।
याचीं दुःखे तुजला मी सांगू किती ।
म्हणउनि येतो श्रीधर काकुळती ॥३॥

(५)

काय सांगू मी या संतांचे उपकार ।
मज निरंतर जागविती ॥१॥
सहज बोलणें हित उपदेश ।
करुनि सायास शिकवीती ॥२॥
काय द्यावें त्यांसी व्हावें उतराई ।
ठेवितां हा पायी जीव थोडा ॥३॥
तुका म्हणे वत्स धेनुवेच्या चित्तीं ।
तैसें मज येथें सांभाळीती ॥४॥

(६)

झाली संध्या संदेह माझा गेला ।
आत्माराम हृदयीं सहजीं आला ॥धृ०॥
गुरुकृपा निर्मळ भागिरथी ।

शांति क्षमा यमुना सरस्वती ।
अशी पदें एकत्र जेथें होतीं ।
स्वानुभव स्नान हें मुक्तस्थिती ।।१।।
सद्बुद्धीचें घालोनि दर्भासन ।
वरी सद्गुरुची दया परिपूर्ण ।
शम दम अंगीं विभूतिलेपन ।
वाचे उच्चारी केशवनारायण ।।२।।
बोधपुत्र निर्माण झाला जेव्हां ।
ममता म्हातारी मरोनि गेली तेव्हां ।
भक्ति बहीण आली असे गांवा ।
आतां संध्या करूं मी कैशी केव्हां ।।३।।
सहज कर्मे झालीं ब्रह्मार्पण ।
ऐसें ऐकोनी निवती साधुजन ।
जन नोहे अवघाचि जनार्दन ।
एका जनार्दनी लाधली निजखूण ।।४।।

(७)

निरंजनीं वनीं देखिली मी गाय ।
तीन तिचे पाय चार मुख ।।१।।
सहस्त्र तिचे नयन नव तिचे कान ।
सत्रावीचें स्थान एक शिंग ।।२।।

ऐशी कामधेनू व्यासानें पाळिली ।
शुकानें वळिली जनकाघरीं ॥।३।
तुका म्हणे ऐसें भाग्य नरा भेटें ।
अभागी करंटे वायां गेले ।।४।।

(८)

देह तो पंढरी प्रेम पुंडलीक ।
स्वभाव सन्मुख चंद्रभागा ।।१।।
विवेकाची वीट आत्मा पंढरीराव ।
जेथे तेथें देव ठसावला ॥२॥
क्षमा दया दोन्ही रुक्मिणी ते राई ।
दोन्हींकडे पाही उभी असे ।।३।।
बुद्धि व वैराग्य गरुड हनुमंत ।
कर जोडोनि तेथें पुढें उभे ।।४।।
तुका म्हणं आम्ही देखिली पंढरी ।
चुकविली फेरी चौऱ्यांशींची ।।५।।

## रात्रीचे भजन

सोमवार-सांब सदाशिव सांब सदाशिव
सांब सदाशिव सांब (जलद दोन वेळा)
सांब सदाशिव सांऽब (उंच स्वरात १ वेळ)

सांब सदाशिव सांब सदाशिव
सांब सदाशिव सांब (पूर्ववत् दोन वेळा)
मंगळवार-सांब सदाशिव सांब सदाशिव सांब
सदाशिव सांब हरा हरा
(सावकाश दोन वेळा. जलद दोन वेळा पुन्हा
सावकाश दोन वेळा.
बुधवार – हरि हरि विठ्ठल रखमाई विठोबा
(खालील स्वरांत तीन वेळा)
हरि हरि विठ्ठल रखुमाई विठोबा
(उंच स्वरांत ३ वेळ).
गुरुवार – जय जय गुरुमहाराज गुरु (४ वेळ)
जयगुरू जयगुरु जयगुरु जयगुरु (दोन वेळा)
जयजय गुरुमहाराज गुरू ।
जयजय परब्रह्म सद्गुरु ॥ (१ वेळ)
शुक्रवार – पावना रामा पतीतपावना रामा
(खालील स्वरांत २ वेळ)
पावना रामा (इतकेंच उंच स्वरांत; उंच स्वरावरून
चालू स्वरांत आल्यावर पूर्ववत् खालील स्वरांत)
पावना रामा पतीत पावना रामा (दोन वेळा)
हरि नारायण गुरुनारायण । घडि घडि घडि जिव्हे

करि पारायण । तव दासोऽहं नारायण ।

हरि नारायण गुरु नारायण ॥

लक्ष्मींश्रीरंगधर सीतारघूवीर राधेगोविंदा ।

हरि हरि राधे गोविंदा ।

रखुमाई पांडुरंगा (तीन वेळा.)

शनिवार – मारुती सखया बलभीमा ।

भजनालागी दे प्रेमा ॥ (२ वेळ)

भजनलागी दे प्रेमा ॥ (३)

मारुती सखया बळभीमा ।

भजनलागी दे प्रेमा । (२ वेळा)

रविवार - सांब सदाशिव सांब सदाशिव सांब सदाशिव सांब हरा हरा (सावकाश २ वेळा जलद २ वेळा. पुन्हां सावकाश २ वेळा.)

## बारा अभंग



जन्माचें तें मूळ पाहीलें शोधून ।
दुःखासी कारण जन्म घ्यावा ॥१॥
पापपुण्य करुनी जन्मा येतो प्राणी ।
नरदेहा येऊनि हानि केली ॥२॥

# बारा अभंग

जन्माचें तें मूळ पाहीलें शोधून ।
दुःखासी कारण जन्म घ्यावा ।। १ ।।
पापपुण्य करुनी जन्मा येतो प्राणी ।
नरदेहा येऊनि हानि केली ।। २ ।।
रजतमसत्त्व आहे ज्याचे अंगीं ।
याच गुणें जगीं वायां गेला ।। ३ ।।
तम म्हणजे काय नरकचि केवळ ।
रज तो सबळ मायाजाळ ।। ४ ।।
तुका म्हणे येथे सत्वाचें सामर्थ्य ।
करावा परमार्थ अहर्निशीं ।। ५ ।।

(२)

अहर्निशीं सदा परमार्थ करावा ।
पाय न ठेवावा आडमार्गीं ।। १ ।।
आडमार्गीं कोणी जन जे जातील ।
त्यांतूनी काढील तोचि ज्ञानी ।। २ ।।

तोचि ज्ञानी खरा तारी दुजीयांसी ।
वेळोवेळां त्यांसी शरण जावें ।। ३ ।।
आपण तरेल  नव्हे तें नवल ।
कुळें उद्धरील सर्वांचीं तो ।। ४ ।।
शरण गेलियानें काय होतें फळ ।
तुका म्हणे कुळ उद्धरीले ।। ५ ।।

(३)

उद्धरीलें कुळ आपण तरला ।
तोचि एक झाला त्रैलोक्यांत ।। १ ।।
त्रैलीक्यांत झालें द्वैतचि निमालें ।
ऐसें साधियेंलें साधन बरवें ।। २ ।।
बरवे साधन सुख शांती मना ।
क्रोध नाहीं जाणा तिळभरी ।। ३ ।।
तिळभरी नाहीं चित्तासी तो मळ
तुका म्हणे जळ गंगेचें तें ।। ४ ।।

जैसी गंगा वाहे तैसें त्याचें मन ।
भगवंत जाण त्याचे जवळीं ।। १ ।।
त्याचे जवळी देव भक्तिभावें उभा ।
स्वानंदाचा गाभा तया दिसे ।। २ ।।
तया दिसें रूप अंगुष्ठप्रमाण ।
अनुभवी खूण जाणती हे ।। ३ ।।
जाणती हे खूण स्वात्मानुभवी ।
तुका म्हणे पदवी ज्याची त्याला ।। ५ ।।

( ५ )

ज्याची त्याला पदवी इतरां न साजे ।
संताला उमजें आत्मसुख ।। १ ।।
आत्मसुख घ्यारे उघडा ज्ञानदृष्टी ।
यावीण चावटी करूं नका ।। २ ।।
करूं नका कांहीं संतसंग धरा ।
पूर्वीचा तो दोरा उगवला ।। ३ ।।

उगवेल प्रारब्ध संतसंगे करुनी ।
प्रत्यक्ष पुराणीं वर्णियेलें ।। ४ ।।
वर्णियेलें एका गुणनामघोषें ।
जातील रे दोष तुका म्हणे ।। ५ ।।

( ६ )

दोष रे जातील अनंत जन्मींचे ।
पाय त्या देवाचे न सोडावे ।। १ ।।
आळवा शारगंधरा भावबळें ।
धरूनि केशव आणा भावबळें ।। २ ।।
पापियां न कळे कांहीं केल्या ।। ३ ।।
न कळे तो देव संतसंगावांचुनि ।
वासना जाळोनि शुद्ध करा ।। ४ ।।
शुद्ध करा मन देहातीत व्हावें ।
वस्तुसी ओळखावें तुका म्हणे ।। ५ ।।

( ७ )

ओळखा रे वस्तु सांडा रे कल्पना ।
नका आडराना जाऊं म्हणीं ।। १ ।।
म्हणीं जाल कोठें बुडवाल हीत ।
विचारी मनांत आपुलिया ।। २ ।।
आपुलिया जीवें शिवासि पहावें ।
आत्मसुख घ्यावें वेळोवेळां ।। ३ ।।
घ्यावें आत्मसुख स्वरूपीं मिळावे ।
भूतीं लीन व्हावे तुका म्हणे ।। ४ ।।

( ८ )

भूतीं लीन व्हावें सांगावें नलगेचि
आतां अहंकाराची शांति करा ।। १ ।।
शांति करा तुम्हीं ममता नसावी ।
अंतरीं वसावी भूतदया ।। २ ।।
भूतदया ठेवा मग काय उणें ।
प्रथम साधन हेंचि असें ।। ३ ।

असें हें साधन ज्याचें चितीं वसें ।
मायाजाळ नासें तुका म्हणे ॥ ४ ॥

( ९ )

मायाजाळ नासें या नासेंकरूनि ।
प्रीति चक्रपाणीं असो द्यावी ॥ १ ॥
असो द्यावी प्रीती साधूंचे पायांसी
कदा कीर्तनासी सोडूं नये ॥ २ ॥
सोडूं नये पुराणश्रवण कीर्तन ।
मनन निदिध्यास साक्षात्कार ॥ ३ ॥
साक्षात्कार झालिया सहज समाधि
तुका म्हणे उपाधि गेली त्याची ॥ ४ ॥

( १० )

गेली त्याची जाणा ब्रह्म तोचि झाला ।
अंतरीं निवाला पूर्णपणें ॥ १ ॥
पूर्णपणें घाला राहतो कैशा रीती ।
त्याची आतां स्थिती सांगतो मी ॥ २ ॥

सांगतों मी तुम्हां ऐका मनोगत ।
राहतो मूर्खवत जगामाजीं ।। ३ ।।
जगात पिशाच्च अंतरीं शहाणा ।
सदा ब्रह्मीं जाणा निमग्न तो ।। ४ ।।
निमग्न तो सदा जैसा मकरंद ।
अंतर्बाह्य भेद वेगळाले ।। ५ ।।
वेगळाले भेद किती त्या असती ।
हृद्गत त्याची गती न कळें कवणा ।। ६ ।।
न कळे कवणाला त्याचें हेंचि वर्म ।
योगी जाणें वर्मं खूण त्याची ।। ७ ।।
खूण त्याची जाणे जे तैसे असती ।
तुका म्हणे भ्रांती दुजियाला ।। ८ ।

## ( ११ )

दुजियाला भ्रांती भाविकाला शांती ।
साधूंचीं ती वृत्ति लीन झाली ।। १ ।।

लीन झाली वृत्ति ब्रह्मातें मिळाले।
जळांत आटलें लवण जैसें । २ ॥
लवण जैसें पुन्हां जळाचे बाहेरी ।
येत नाहीं खरें त्यांतूनीया ॥ ३ ॥
त्यासारिखे तुम्हीं जाणा साधुवृत्ति ।
पुन्हां न मिळती मायाजळीं ॥ ४ ॥
मायाजाळ त्यांना पुन्हां रे बाधेना ।
सत्य सत्य जाणा तुका म्हणे ॥ ५ ॥

( १२ )

स्वर्गलोकींहूनि आले हे अभंग ।
धाडियेले सांग तुम्हांलागीं ॥ १ ॥
नित्यनेमें यांसी पढतां प्रतापें ।
जळतील पापें जन्मांतरिचीं ॥ २ ॥
तया मागें पुढें रक्षी नारायण ।
मांडिल्या निर्वाण उडी घाली ॥ ३ ॥
बुद्धीचा पालट नांसेल कुमती ।

होईल सद्भक्ति येणें पंथें ।। ४ ।।
सद्भक्ति झालिया सहज साक्षात्कार।
होईल उद्धार पूर्वजांचा ।। ५ ।।
साधतील येणें इहपरलोक ।
सत्य सत्य भाक माझी तुम्हां ।। ६ ।।
परोपकारासाठीं सांगितलें देवा ।
प्रासादिक मेवा ग्रहण करा ।।७।।
येणें भवव्यथा जाईल तुमची ।
सख्या विठ्ठलाची आण मज ।।८।।
टाळ आणि कथा धाडिली निशाणी ।
घ्या रे ओळखोनि सज्जनहो ।।९।।
माझें दंडवत तुम्हां सर्व लोकां ।
देहासहित तुका वैकुंठासी ।। १० ।।

(१३)

सत्य सत्य जाणा त्रिवाचा नेम हा ।
अनुभव पाहा पदोपदीं ।। १ ।।

पदोपदीं पाहा श्रीमुख चांगलें ।
प्रत्यक्ष पाऊलें विठोवाची ।। २ ।।
विठोबाचे भेटीं हरेल वा चिंता ।
तुम्हालागीं आतां सांगितले ।। ३ ।।
सांगितलें खरें विश्वाचिया हिता ।
अभंग वाचिती जे कां नर ।। ४ ।।
ते नर पठणीं जीवन्मुक्त झाले ।
पुन्हां नाहीं आले संसारासी ।। ५ ।।
संसार उडाला संदेह फिटला ।
पूर्ण तोचि झाला तुका म्हणे ।। ६ ।।

( १४ )

चार कोटि एक लक्षाचा शेवट ।
चौतिस सहस्त्र स्पष्ट सांगितले ।। १ ।।
सांगितले तुका कथोनियां गेला
बारा अभंगाला सोडूं नका
सोडूं नका तुम्हा सांगितलें वर्म ।

भवपाश कर्मे चुकतील ।। ३ ।।
चुकती यातायाती विठोबाची आण ।
करा हे पठण जीवेभावें ।। ४ ।।
जीवेंभावें करितां होईल दर्शन ।
प्रत्यक्ष सगुण तुका म्हणे ।। ५ ।।

( १५ )

वेदाचे अभंग केले श्रुतिपर ।
द्वादश सहस्त्र संहित्तेचे ।। १ ।।
निघंट निरुक्त आणि ब्रम्हसुत्र ।
अवतार सहस्त्र उपग्रंथ ।। २ ।।
अभंग हे कोटी भक्तिपर झाले ।
ज्ञानपर केले तितुकेची ।। ३ ।।
पंचाहत्तर लक्ष वैराग्य वर्णिलें ।
नाम तें गाईलें तितुकेची ।। ४ ।।
साठ लक्ष केला बोध या जगासी ।
वर्णिले रूपासी तितुकेंची ।। ५ ।।

तीस लक्ष केली देवासी करुणा ।
कर्मकांड जाणा एक लक्ष ।। ६ ।।
द्वादशसहस्त्र स्वात्मानुभवीं
एवं जाणा सर्व संख्या ऐशी ।। ७ ।।
ऐसे हे अभंग झालेसे भूतळीं ।
पांच अतराळीं पत्रिकेची ।। ८ ।।
चोतीस सहस्त्र लक्ष एक कोटि पाच ।
सांमोनिया साच गेला तुका ।।९।।

( १६ )

सगुण हें ब्रम्ह विठ्ठलचि बोले ।
ऐक पां वहिलें तुकारामा ।। १ ।।
तुकारामा तुवां केले जे अभंग ।
करिती जे कां जगीं नित्य पाठ ।। २ ।।
जगीं पाठ करितां आवडी सब्दावें ।
विपत्ति न होय त्या प्राण्यासी ।। ३ ।।
प्राण्याचे कल्याण होईल वा पाहे ।

भावें वाचितां हे नित्यनेमें ।। ४ ।।
नेमें संकष्टासी करी अकरा पाठ ।
विघ्न त्याचें स्पष्ट दूर होय ।। ५ ।।
दूर होय विघ्न विठ्ठल म्हणे तुकया ।
शेवटीं निज ठाया नेईन मी ।। ६ ।।

( १७ )

गुरुचरणीं ठेविति भाव ।
आपोआप भेटे देव ।। १ ।।
म्हणुनि गुरुसी भजावें ।
रूप ध्यानासी आणावें ।। २ ।।
देव गुरुपाशीं आहे ।
वारंवार सांगूं काये ।। ३ ।।
तुका म्हणे गुरुभजनीं ।
देव भेटे जनीं वनीं ।

( १८ )

जयजय गुरुमहाराज गुरु । (५ वेळा)

जयजय परब्रह्म सद्गुरु । (१ वेळा)
जयगुरु जयगुरु जयगुरु जयगुरु ।
जयगुरु जयगुरु जयगुरु जयगुरु ।।

(१९)

सब संतनकी जय !
बालगोपालकी जय !
तुकाराममहाराजकी जय !
ज्ञानोबामहाराजकी जय !
रुक्मांगदमहाराजकी जय !
कृष्णद्वैपायनमहाराजकी जय !
रामदासमहाराजकी जय !
रघुनाथप्रियमहाराजकी जय !
श्री भाऊसाहेबमहाराजकी जय !
श्रीअंबुरावमहाराजकी जय !
श्रीगुरुदेव रामभाऊमहाराजकी जय !
श्रीगुरुदेव दत्त दत्त दत्त !

( २० )

रामाश्रम सद्‌गुरुराज ।
गुरुलिंगजंगममहाराज ॥ ( २ वेळा )
गुरुलिंगजंगममहाराज । ( २ वेळा )
रामाश्रम सद्‌गुरुराज ।
गुरुलिंगजंगममहाराज । ( २ वेळा )
हिंचगेरीवासी सद्‌गुरुराज ।
उमदीं भाऊसाहेबमहाराज ॥ ( २ वेळा )
उमदी भाऊसाहेबमहाराज (२ वेळा )
हिंचगेरीवामी सद्‌गुरुराज ।
उमदी भाऊसाहेबमहाराज ॥ ( २ वेळा )
हिंचगेरीवासी सद्‌गुरुराज ।
जिगजेवणि अंबुरावमहाराज ॥ (२वेळा )
जिगजेवणि अंबुरावमहाराज ॥ (२वेळा)
हिंचगेरीवासी सद्‌गुरुराज ।
जिगजेवणि अंबुरावमहाराज ॥ (२वेळा)
निंबाळवासी सद्‌गुरुराज ।

गुरुदेव रामभाऊमहाराज ।। (२वेळा)
गुरुदेव रामभाऊमहाराज ।। (२वेळा)
निंबाळवासी सद्गुरुराज ।
गुरुदेव रामभाऊमहाराज ।। (२वेळा)

(२१)

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा ।
माझिया सकळां हरिच्या दासां ।।१।।
कल्पनेची बाधा न हो कोणेकाळीं ।
ही संतमंडळी सुखी असो ।।२।।
अहंकाराचा वारा न लागो राजसा ।।
माझ्या विष्णुदासा भाविकांसी ।। ३ ।।
शरीर प्राणांसी करीन कुरवंडीं ।
क्षण एक न सोडी संग त्याचा ।। ४ ।।
नामा म्हणे तया असावें कल्याण ।
ज्या मुखीं निधान पांडुरंग ।। ५ ।।

विठ्ठल रखुमाई विठोबा रखुमाई
विठ्ठल विठ्ठल विठ्ठल ! ! !

( २२ )

मी तंव अन्यायी अपराधी ।
कर्महीन मतिमंदबुद्धी ।। १ ।।
तुज म्यां आठविले नाहीं कधीं ।
वाचे कृपानिधि मायबापा ।। २ ।।
नाहीं ऐकिलें गाइलें गीत ।
धरिली लाज सांडिलें हित ।। ३ ।।
नावडे पुराण बैसले संत
केली बहुत परनिंदा ।। ४ ।।
केला नाहीं करविला नाहीं परोपकार ।
नाहीं दया आली पीडितां पर ।। ५ ।।
करूं नये तो केला व्यापार ।
उतरी पार तुका म्हणे ।। ६ ।।

ज्ञानोबा तुकाराम ज्ञानोबा तुकाराम ।
तुकाराम तुकाराम तुकाराम ! ! !

(२३)

अहो बोलिलें लेकरूं ।
वेडें वाकुडें उत्तरूं ।। १ ।।
क्षमा करा अपराध ।
महाराज तुम्ही सिद्ध ।।ध्रु०।।
अहो नाहीं विचारिला ।
अधिकार म्या आपुला ।। २ ।।
तुका म्हणे ज्ञानेश्वरा ।
राखा पायापें किंकरा ।। ३ ।।

( २४ )

पाहे प्रसादाची वाट ।
द्यावें धुवोनिया ताट ।।१।।

शेष घेंउनि जाईन
तुमचें झाळिया भोजन ।।२।।
अहो झालों एकसवा ।
तुम्हां आड न ये देवा ।। ३ ।।
तुका म्हणे चित्त ।
करुनि राहिलों निवांत ।। ४ ।।



# विडा

विडा घ्यावो नारायणा । कृष्णा जगज्जीवना ।
विनविते रखुमाई । दासी होईन मी कान्हा ।। धृ० ।।
शांति हे नागवेली – । पानें घेऊनियां करीं ।।
मीप्पण जाळुनीयां । चुना लावियेला वरी ।। १ ।।
वास्सना फोडुनीयां चूर्ण केली सुपारी ।।

भावार्थ कापुरानें । घोळियेली निर्धारी ।। २ ।।
विवेक हा कातरंग । रंगीं रंगला सुरंग ।
वैराग्य जायफळ । मिळविले सकळ ।। ३ ।।
दया ही जायपत्रीं । क्षमा लवंगा आणिल्या ।
सुबुद्धि वेलदोडे । शिरानीं अर्पिले ।। ४ ।।

( २ )

विडा घेई नरहरी राया । धरूनि मानवाची काया ।।
यति वेष घेऊनिया । वससी दीनासी ताराया ।।ध्रु०
ज्ञान हे पूगीफळ । भक्ति नागवल्ली दळ
वैराग्य पूर्ण विमळ । लवंगा सत्क्रिया सकळ ।। १।।
प्रेम रंगी जैसा कात । वेला अष्ट भावसहित ।।
जायफळ क्रोधरहित । पत्री सर्व भूत-हित ।। २ ।।
खोवरे हेचि क्षमा । काढुनी द्वैताच्या वदामा ।
मनोजाचा वर्ख हेमा । कापूर हा शांति नामा ।। ३ ।।
कस्तूरी निरहंकार । कोठें न मिळती हे उपचार ।।

भिमपुत्र यास्तव फार । सत्वर देई वारंवार ।।४।।

(३)

माडो परमेश्वरगुरुध्याना । विडदिरुवदु भजना ।
नोडो नी निन्नोळु निजखूना । पूर्णैक्यद ज्ञाना ।। १ ।।
अपरूपद नरतनुविदु नोडो । सडगरदा पाडो ।
अपहास्यव माडदे नी कूडो । घनचिन्मय गूडो ।।२।।
अग्नीचक्रद बळियल्लि । एरडु कमलदल्लि ।
प्राज्ञा झगिझगिसुव बेळकल्लि । तिळि निन्नोळगिल्लि ।३।।
मेलिन स्थानद सहस्रा । । गुरुतत्वदपूरा ।
पेळलळवल्लद सुखसारा ।। शंकर पदविवरा ।।भीमा।।

# आरत्या

जय जया दासबोधा ग्रंथराजा प्रसिद्धा । आरती ओवाळीन विमळज्ञान वाळबोधा ।।ध्रु०।। वेदांत-संमतींचा काव्यसिंधु भरला । श्रुतिशास्त्रग्रंथगीता साक्ष संगम केला । महानुभाव संतजनीं अनुभव चाखिला । अज्ञान जडजीवा मार्ग सुगम झाला ।।१।।

नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी । चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी । हरिहरहृदयींचें गुह्य प्रकट दावी । बद्धचि सिद्ध झाले असंख्यांत मानवी ।।२।।

वीसही दशकींचा अनुभव जो पाहे । नित्यनेम विवरितां स्वयें ब्रह्मचि होये । अपार पुण्य गाठीं तरि श्रवण लाहे । कल्याण लेखकाचें भावगर्भ हृदयीं ।। ३ ।।

(२)

सुखसहिता दुःखरहिता निर्मळ एकांता । कलिमल दहना गहना स्वामी समर्था ।। न कळे ब्रह्मादिका अंत अनंता । तो तूं आम्हां सुलभ जयकृपावंता ।।१।। जयदेव जयदेव जय करुणाकरा । आरती ओंवाळूं सद्गुरुमाहेरा ।।धृ।। मायेविण माहेर विश्रांति ठाव । शब्दीं अर्थलाभ बोलणें वाव ।। सद्गुरु प्रसादें सुलभ उपाव । रामीं रामदासा फळला सद्भाव ।।२।।

(३)

पंचप्राणवेंब आरति माडीरि । पंचतत्ववेंब वत्ति हच्चिरि । चंचलवृत्तियेंब घृतवन्हाकीरी । पंचकर्मेंद्रियगळ पहन माडीरि ।। १ ।। जयदेव जयदेव जयपरमहंसा, गुरु–परमहंसा । दयमाडिदय्या नी एनगे सर्वेशा ।। जयदेव

जयदेव ।। घ्रु० ।। आदर परसि आरु चक्रा मीरिसिदि ।
वेदके निलुकद निजगुणरत्ना तोरिसिदि ।। आदिनाथनल्लि
लक्ष्यविडिसीदि । नादद मूलॐकारदोळु बेरिसिदि ।।
जयदेव जयदेव ।। २ ।। तंदेत्रिमल्ल नी सद्गुरुनाथा ।
कंदगे ज्ञानद वस्तु कोट्टंथा दाता ।। संदेह बिडिसि एनगे
माडिदि प्रख्याता । छंददि भजिसुवे ना निनगे अवधूता ।।३।।
जयदेव जयदेव ।।

(४)

आरती करा हो सज्जन । द्वैतभाव टाकून ।।धृ।।
विवेक सद्वुद्धि । सद्बूद्धि । लक्ष लावुनी पदीं ।। अंतः-
करण । मनशुद्धि । द्वैतातीतें बुद्धि ।।१।। इडा पिंगळा ।
सुषुम्ना । मार्ग आहे कठीण ।। त्रिकूट संगम । समजंन ।
महालिंग दर्शन ।।२।। चिन्मय गुरुमुर्ति । गुरुमूर्ति । अणुरेणू
भासती ।। वुद्धि भासाची । भासाचि । गूरुपुत्र जाणती ।।३।।

(५)

आरति ज्ञानराजा । महा कैवल्यतेजा । सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ।।धृ।। लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी । अवतार पांडुरंग । नाम ठेंवियलें ज्ञानी ।।१।। कनकाचें ताट करीं । उभ्या गोपिका नारी । नारद तुंवर हो । साम गायन करी ।।२।। प्रकट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें । रामा जनार्दनी । पायीं टकचि ठलें ॥३॥

(६)

कर्पूरारति एत्ति बेळगिरि । कारुण्यामृतकरा देवगे ।।प.।। नीलकंधर निगम गोचर । भालचंद्राभरणगे ।। बालगोलिदनु हालाहल सविदनु । लोल श्रीगुरुरायगे ।।१।। वारिजोभ्दवशिरव हरिदनु । मारहर महादेवगे ।। घोर दुरितव दूर माडुव । शूर षणमुखनय्यगे ॥२॥ शरणु जनके वरव नित्तनु । परम पार्वतियरसगे ।। धरेयोळधिकवाद मुरशिगर । पुरद सिद्धनाथगे ।

(७)

जय जय काडसिद्धा । आरति माडुवे सिद्धा ।।प.।।
मुत्तिन आरति । बंगारद वत्ति । दीविगि चंद्रदीप्ति ।
बळगुवे पूर्णं भक्ति ।।१।। आरति माडुत प्रेमदि हाडुत ।
स्वामी ना निन्न दूत । करूणा माडो कृपावंत ।।२।।
आरति मेच्चिद तानु वरव कोडबंद । कृपा दृष्टियिंद ।
तुळजागे सदानंदा ।।३।।

(८)

जय जय जय जय आरति माडुवे ।। जय जय
जय जय आरति तुंबुवे ।। जय जय जय जय आरति
बेळगुवे ।। अंगदायक स्वामिगे ।।प.।। सूर्यवर्णिगे
सुंदररूपिगे । मंदिरदोळु कुणिदाडु देवगे ।
चौरि चामर छत्रदोडेयगे । मुप्पिन मुनिगे ओप्पुव
रूपिगे ।। सांवहरनिगे साक्षात् शिवनिगे । बेळगुवे
आरतीय ।।१।। चंद्रवर्णिगे चिन्नरूपिगे । मंजिनोळगिरु
महाहर शिवनिगे ।। पंजिन बेळीकले रंजिसु मुखगे । नील –
वर्णिगे बालवेषगे ।।२।। ज्योतिवर्णिगे डुलासु रूपिगे

नलिनलिदाडुव नागर हेडिगे ।। अगमकारगे अनेक–
रूपिगे । जगद अरसगे जन्म विनाशगे ।।३।। लिंग –
वर्णिगे निझंकारगे । झणा झणा वहुनाद भोरगे ।
अंगदोळगिरु संगमेशगे । गंगाधरगे गौरीहरगे ।।४।।
एन्नवर्णिगे चन्नरूपिगे । भिन्नविल्लदे पाद तोरुवगे ।
मत्ते बारद मुक्ति कोट्टवगे । नंविद भक्तगे तुंवितुळु ।
कुशिवगे ।।५।। देशकधिकवाद वास उमदी । गुरुविन
पाददोळानंद शिवा । आतन वोधदोळु निमग्न हरा ।
नडु मध्यदलिल कंडेवु धना ।। परिपरियिदलि परमा–
त्मनिगे ।।६।।

(९)

ज्योति वेळगुतदे । झगझग । ज्योति बेळगुतदे ।।प.।।
मस्तमगिरि चन्न मस्तकदोळु चलुव ।। वस्तु काणुतदे
झगाझग । १।। मानस तुदियलि ज्ञानके निलुकदे । ताने
होळेयुतदे झगाझग ।।२।। कंगळ मध्यदि तुंग गुड्डद
योगि । अंग होळेयुतदे झगाझग ।। लिंग होळेयुतदे
झगाझग ।।३।।

(१०)

नमो नमो एंबे । गुरुवे कडिधायिसु तंदे ।।प.।।
हर हर ।। सदामरित एन्न हृदयकमलदोळु ।। सुधा
अमृतवनु सुरिसुवि एंबे ।।अ.प.।। आशे माडिबंदे ।
निन्न अनुभवदोळु कुंते ।। मोसवागदे भासुर प्रणमदोळु ।
निराशतपदोळु निळिसिदे तंदे ।।१।। अर्थवागुवंते ।
अनुमान । विट्टु होगुवंते ।। सत्यदि शिवभजान
नित्यदि माडुवाग । व्यर्थ चिंतेगळ परिहारिसो
तंदे ।।२।। पुण्य सुकृतदिंदे । निमगे एल्ल जीवगळोंदे ।।
वल्लिद श्रीगुरु बसवलिंगगे । मंगळारति बेळगुवेनंबे ।३।।

(११)

मंगलं महालिंग उमदीशा । मुनिजन पोषा ।।
भासउपाधीतीत सर्वेशा । इंचगेरिवासा ।।ध्रु०.।।
पृथ्विमेलिन प्रेमभक्तरनु । परिपालिसुव । नित्यनित्यदि
सत्य शंकरने ।। चित्तशुद्धि माडु एन्न कर्तृ निन्न
करुणविट्टु । मृत्यविन बाधेयनु बिडिसुव सत्य सद्गुरु
काडसिद्धा ।।१।। धरणिपालिप दुरितसंहरने ।

त्रिपुरांतकने । चरसेवकभजकरक्षकने । मायावि नीनें परमपावन पंचपाशकने । मोरेय होक्करे विरदु कागुव अरवु कोट्टु मरवु विडिसुव । शरणुजनर स्मरणि तारक सुंदरात्मक सगुणनिधिये ।।२।। अष्टदिक्पालकर वडेयने । सृष्टीकर्ता । श्रेष्ठ सद्गुरु लिंगजंगमने ।। निष्ठेयिंदलि नंबिदवर कष्ट कळेदु कडय हासिसुव । वृष्टि अमृत सुरिदु जगदि जय जय पडेदंथसद्गुरु ।।३।।

(१२)

जयदेव जयदेव जय सद्गुरुराया । जय अंबुराया ।
ओवाळु पंचारति । प्रेमें तव पाया । जय० ।।
जीर्णोद्धार कराया आत्मज्ञानाचा ।
झालासे अवतार भक्तीभावाचा ।।
पाहूनी प्रभाव गुरुनी अंत.शक्तीचा ।
प्रेमे तुज दिधला घट अमृतनामाचा ।।१।।
भक्तीभावे तनमन गुरुपदी अर्पियलें ।

त्रिकाळ साधन करुनी ते व्रत उद्धरिलें ॥
सेवा तव पाहुनिया भाऊराय भुलले ।
'झालो धन्य' म्हणुनी विरूद बांधियले ।।२।।
सादर सद्‌गुरुचरणीं सर्वारपण केले ।
माझे मीपण तेणें विरूनिया गेले ।।
परमानंदी अवघे मन ते मावळले ।
आत्मपदावरी श्रीगुरुराये भूषविले ।।३।।
सद्‌गुरुनामाचा तो डंका वाजविला ।
कर्नाटक महाराष्ट्री झेंडा रोविला ।।
जीवन्मुक्तीचा निजमार्गहि दावियला ।
आरति करुनी पावन दास राम झाला ।।४।।

प. पूज्य श्रीसमर्थ गुरुदेव रामचंद्र दत्तात्रय रानडे
यांची आरती

(१३)

जयदेव जयदेव जयसद्‌गुरु रामा । गुरुदेवा रामा ।।
आरति ओवाळूं तुज आत्मारामा ।।ध्रु० ।। जंबूखंडी
ग्रामीं कर्नाटक देशीं । रामेश्वर वरदाने अवतार घेशी ।

उमदीशानुग्रह तुज लाभे बाल्यदशीं । साधनयोगें कैवल्याचा प्रभु होशी ।।१।। गुरुलिंगजंगम प्रभुचा तूं नव अवतार । सद्‌गुरु उमदीशाचा शिष्योत्तम थोर भक्तिपथाचा प्रेषित सिद्ध महोदार । साक्षात्काराचा तूं महाभाष्यकार ।।२।। निंबाळाश्रम तव हें मुक्तीचें तीर्थं । परमार्थाचें मंदिर अध्यात्मपीठ । ध्यानाची नेमाची असे साधनपेठ । भक्तजनांना वाटे भूवरि वैकुंठ ।।३।। भक्तीची फल्गुनदी पुनरपि प्रकटाया । जडजीवां ताराया अवतार घ्यावा । भक्तजनांचें वांछित पुरवा गुरुदेवा । लक्ष्मीसुत प्रार्थितसे धरूनि नम्रभावा ।।४।। जयदेव जयदेव ।।

(१४)

( चाल :- जय जय गुरुलिंगा )

जय जय श्रीगुरुदेवा । वाढवि सद्‌भावा । भक्त-जनांना दावा । अक्षय निज ठेवा ।।ध्रु०।। नवयुगिचा

वर संत । अभिनव हृदयांत । नवजीवनमूल्यांना । फुलविसि गा त्वरित ॥१॥ विज्ञानात्मज्ञान । पूरक जाणोन । तेणें करण्या कथिसी । जीवन परिपूर्ण ॥२॥ आत्मज्ञानाचार्या । साक्षाच्चित्सूर्या । आत्मप्रभा दावुनिया । धन्य करिसि आर्या ॥३॥ स्वानंदास्तव येत । भाविकजन आर्त । नाम–सुधा सेवुनिया । होती कृतार्थ ॥४॥ आरति मनोहर । मंगलमय थोर । ओवाळी प्रेमभरें । करी जय जयकार ॥५॥

(१५)

ऐसी आरति त्रिभुवन तारै । तेजपुंज तहॆ प्राण उतारै ॥१॥ पाती पंच पुहुप करि पूजा । देव निरंजन और न दूजा ॥२॥ तन मन सीस समरपन कीन्हा । प्रगट ज्योति तहॆ आतम लीना ॥३॥ दीपक ज्ञान सबद धुनि घंटा । परम पुरिख तहॆ देव अनंता ॥४॥ परम प्रकाश सकल उजियारा । कहै कबीर मैं दास तुम्हारा ॥५॥

# शेजारती

आतां स्वामी सुखें निद्रा करा अवधुता । नरसिंह-सरस्वति अवधुता । चिन्मयसुखधामीं जाउनि पहुडा एकांता ।।६९०।। वैराग्याचा कुंचा घेउनि चौक झाडिला । तयावरी सप्रेमाचा शिडकावा केला ।।१।। पायघड्या घातल्या सुंदर नवविधा भक्ती । ज्ञानाच्या समया उजळुनि लाविल्या ज्योती ।।२।। भावार्थाचा मंचक हृदयाकाशीं टांगिला । मनाचीं सुमनें जोडुनि केलें शेजेला ।।३।। द्वैताचें कपाट लावुनि एकत्र केलें । दुर्बूद्धीच्या गांठी सोडुनि पडदे सोडिले ।।४।। आशा-तृष्णा कल्पनांचा सांडुनि गलबला । क्षमा दया शांती दासी उभ्या सेवेला ।।५।। अलक्ष्य उन्मनि घेउनि नाजुक दुशेला निरंजनीं सद्‌गुरु माझा निजीं निजेला ।।६।।

( एकादशीस म्हणणेचा )

कृष्णा धांव बा लवकरी, संकट पडले भारी, हरि तूं आमुचा कैवारी, आलें विघ्न निवारी ।।६९०।।

पांडव असतां, वनवासी, कळलें कौरवांसी, त्यांनीं पाठविले, ते ऋषी, सत्र हरायासी ॥१॥रात्र झालीसे, दोनप्रहर, आले ऋषीश्वर । भोजन, मागती सत्वर, करुं कैसा विचार ॥२॥ साठी सहस्त्र, खंडी अन्न, दुर्वास, भोजन । सत्व जातील, घेऊन, अंतर पडता जाण ॥३॥ आजि निष्ठुर कां, झालासी, कोठें गुंतलासी । माझी होईल वा, गत कैसी, अनाथ मी परदेशी ॥४॥ कंठ शोषला अनंता, प्राण जाईल आतां । पदर पसरीते, तुज आतां, पाव रुक्मिणी कांता ॥५॥ आतां न लावी उशीर, धर्म चिंतातूर । अनर्थ करील, तो फार, एवढा करी उपकार ॥६॥ ऐकुनि बहिणीची करूणा, आला यादवराणा । द्रौपदी लोळतसे, हरिचरणा, उद्धवचिद्घन जाणा ॥

# करूणाष्टक

## (एकादशीस म्हणणेचे)

तत्र कळतां मग जाणीव-भाव नाहीं । स्वानंद तृप्ति

सकळांसहि मुक्ति पाही । राहो ऽथवा तनु पडो समता जथाला । अद्वैत-बोद्ध-पद निश्चय पूर्ण झाला ॥१॥ स्वप्नेंद्रजालवत मायिक सर्व आहे । यालागिं निश्चय मनीं भय कोण वाहे । स्वप्रत्ययें विविध भाव अभाव गेला । अद्वैतबोधपद. ॥२॥ ज्ञानानळें विविध संचित दग्ध झालें । वंध्याविलासवत तें क्रियमाण झालें । प्रारब्ध शेष उरलें जन निश्चयाला । अद्वैत बोधपद. ॥३॥ कोणी उदास वन वासिच खेळ खेळे । कोणीहि कर्मरत आश्रमधर्म केले । स्वच्छंदता रमत एक विकल्प गेला । अद्वैतबोधपद. ॥४॥ रक्षु गजा मदगजारुढ राजभद्री । भिक्षू अकिंचन उदासिन हो दरिद्री । संकल्पशून्य मन आग्रहि भाव ठेला । अद्वैतबोध पद, ॥५॥ जीवेश्वरा आणि जगाप्रति एक काळें । निर्धारिलें घटमठीं नभ जेवि खेळे । वेदांत-संत -निज संमत याचि बोला । अद्वैतबोध पद. ॥६॥ सिंधूहि सिंधूस भास्कर जो तयातें । त्याहूनि चोज उपमा न दिसे तयातें । वर्णील कोण गुणवर्जित निर्गुणाला । अद्वैतबोधपद. ॥७॥ हा चिद्विलास मुनि मानस-हंस जाणा । विश्वीं वसे परि निरंकुश-गम्य जाणा । रंगोनि भास्कर निजानुभवीं

बुडाला । अद्वैत बोधपद ॥८

# करूणाष्टकें

## सोमवार

ज्या संगतीनेंच विराग झाला । मनोदरींचा जडभास गेला । साक्षात्परात्मा मज भेटवीला । विसरूं कसा मी गुरुपादुकाला ॥१॥ सद्योगपंथे धरि आणियेले। अंगेंच माते पर-ब्रम्हु केलें । प्रचंड तो बोधरवी उदेला । विसरू ॥ २ ॥ चराचरीं व्यापकता जयाची । अखंड भेटी मजला तयाची । परंपदीं संगम पूर्ण झाला । विसरूं. ॥ ३ ॥ जो सर्वदा गुप्त जनांत वागें । प्रपन्न भक्तां निजबोध सांगें । सभ्दक्ति - भावांकरितां भुकेला । विसरूं० ॥ ४ ॥ अनंत माझे अपराध कोटी । नाणी मनीं घालुनि सर्व पोटीं । प्रबोधितां तो श्रम फार झाला । विसरूं० ॥ ५ ॥ कांही मला सेवनही न झालें । तथापि तेणें मज उद्धरीलें । आतां तरी अर्पिन प्राण

त्याला । विसरूं. ॥६॥ माझा अहंभाव आसे शरीरीं । तथापि तो सद्गुरू अंगिकारी । नाहीं मनीं अल्पविकार झाला । विसरूं. ॥ ७ ॥ आतां कसा हा उपकार फेडू । हा देहा ओंवाळूनि दूर सोडूं । त्यां एकभावें प्रणीपात केला । विसरूं ॥८॥ जया वानितां वानितां वेदवाणी । म्हणे नेंति नेंती तिला जे दुरूनी । नव्हे अंत ना पार ज्याच्या रुपाला । विसरू ॥ ९ ॥ जो साधूच्या अंकित जीव झाला । त्याचा असे भार निरंजनाला । नारायणाचा भ्रम दूर केला । विसरूं ॥१०॥

## मंगळवार

समाधान साधूजनांचेनि योगें ॥ परी मागुतें दुःख होते वियोगें । घडीने घडी शीण अत्यंत वाटें । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥१॥ धरें सुंदरें सौख्य नानापरीचें । परी कोण जाणेल तें अंतरींचें । मनीं आठवितांचि तो कंठ दाटे । उदासीन० ॥२॥ बळें लाविता चित्त कोठें जडेना । समाधान तें कांहि केल्या घडेना । नयें धीर डोळां

सदा नीर लोटे । उदा० ॥३॥ अवस्था मनीं लागली काय सांगों । गुणीं गुंतला हेत कोणासि मागों । बहुसाल भेटावया प्राण फूटे । उदा० ॥४॥ कृपाळुपणें भेट रे रामराया । वियोगें तुझ्या सर्व व्याळकू काया । जनांमाजि लौकीक ह्याही न सूटे । उदा० ॥५॥ अहा रे विधी त्वां असें काय केलें । पराधीनता पाप माझें उदेलें । बहूतांमधें तूकतां तूक तूटे । उदा० ॥६॥ समर्था मनीं सांडि माझी नसावी । सदा सर्वदा भक्तचिंता असावी । घडेना तुझा योग हा प्राप्त खोटें । उदा० ॥७॥ अखंडीत हे सांग सेवा घडावी । न होतां तुझीं भेटि काया पडावी । दिसंदीस आयुष्य हे व्यर्थ लोटे । उदा० ॥८॥ भजों काय सर्वापरी हीन देवा । करूं काय रे सर्व माझाचि ठेवा । म्हणों काय मी कर्म रेखा न लोटे । उदा० ॥९॥ म्हणे दास मी वाट पाहे दयाळा । रघुनायका भक्तपाळा भुपाळा । पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें । उदा० ॥१०॥

## बुधवार

युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवंचितां । नेणता भक्त मी तुझा बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥ मन हें आवरेना कीं वासना वावरे सदा । कल्पना धांवते सैरा बुद्धि दे० ॥२॥ अन्न नाहीं वस्त्र नाहीं सौख्य नाहीं जनामध्यें । आश्रयो पाहतां नाहीं बुद्धि दे० ॥३॥ बोलतां चालतां येना कार्यभाग कळेंचिना । वहुत पीडलों लोकीं बुद्धि दे० ॥४॥ तुझा मी टोणपा झालों कष्टलों बहुतांपरी । सौख्य तो पाहतां नाहीं बुद्धि दे० ॥५॥ नेटकें लिहितां येना वाचितां चुकतों सदा । अर्थ तो सांगतां येना बुद्धि दे० ॥६॥ प्रसंग वेळ तर्केंना सुचेना दीर्घ सुचना । मैत्रिकी राखतां येना बुद्धि दे० ॥७॥ संसारी श्लाध्यता नाहीं सर्वंही लोक हांसती । विसरू पडतो पोटीं बुद्धि दे० ॥८॥ चित्त दुश्चित होतें हें ताळतंत्र कळेचिना । आळसू लागला पाठीं बुद्धि दे० ॥ ९ ॥ कळेना स्फुर्ति होईना आपदा लागली बहू । प्रत्यहीं पोट सोडीना

बुद्धि दे० ।।१०।। संसार नेटका नाहीं उद्वेग वाटतो जिवीं । परमार्थ आकळेना कीं बुद्धि दे० ।।११।। देईना पूर्विना कोणही उगेची जन हांसती । लौकिक राखतां येना बुद्धि दे० ।।१२।। पिसुणें वाटती सर्व कोणीही मजला नसे । समर्था तूं दयासिंधु बुद्धि दे० ।।१३।। उदास वाटतें जीवी आतां जावें कुणीकडे । तूं भक्तवत्सला रामा बुद्धि दे० ।।१४।। कायावाचा-मनोभावें तुझा मी म्हणवीतसे । हे लाज तुजला माझी बुद्धि दे० ।। १५ ।। सोडविल्या देवकोटी भूभार फेडिला कळे । भक्तांसी आश्रयी मोठा । बुद्धि दे० ।। १६ ।। उदंड भक्त तुम्हांला आम्हाला कोण पुसतें । ब्रीद हें राखणें आधीं बुद्धि दे० ।। १७ ।। उदंड ऐकिली कीर्ति पतीत-पवना प्रभु । मी एक रंक दुर्बुद्धी बुद्धि दे० ।। १८ ।। आशा हे लागली मोठी दयाळुवा कृपा करी । आणिक नलगे कांहीं बुद्धि दे रघुनायका ।। १९ ।। रामदास म्हणे माझा संसार तुज लागला । संशयो वाटतो पोटीं बुद्धि दे० ।।२०।। जयजय रघुवीर समर्थ ।।

## गुरुवार

सदा प्रार्थितों श्रीगुरुच्या पदांसी । धरीतों शिरीं वंदितों आदरेसी । धरूनी करीं तारि या बालकासी । नमस्कार हा स्वामि दत्तात्रेयासी ॥ १ ॥ मतीहीन मी दीन आहे खरा हो । परी मी तुझा दास, कृपा कराहो । जसें लेकरूं पाळिते माय कूशीं । नमस्कार हा० ॥ २ ॥ लडीवाळ मी बाळ अज्ञान तूझा । गुरूवांचुनी पांग फेडील माझा । तुझ्यावीण दूजा कोण आहे आम्हांसी । नमस्कार हा० ॥३॥ पिता माय बधू सखा तूंचि देवा । मुलें मित्र सारे सोयरे व्यर्थ हेवा । कळोनि असे भ्रांति होई आम्हांसी । नमस्कार हा० ॥ ४ ॥ चरित्रें गुरूचीं करी नित्य पाठ । जया भक्ति लागे पदीं एकनिष्ठ । तयाचे कुळीं दीप सज्ञानराशी । नमस्कार हा० ॥५॥ वसे उंबरासन्निध सर्वकाळ । जनीं काननीं घालवी नित्यकाळ । तया सद्गुरूचें नाम कल्याणराशी । नमस्कार हा० ॥ ६ ॥ श्रमोनी गुरूपाशि तो म्लेंछ आला । तया स्फोटरोगांतुनी

मुक्त केला । कृपेनें तसें स्वामि पाळी आम्हांसी । नमस्कार हा० ॥७॥ सती अनुसूया सुखी आधीमाता । त्रयी–मूर्ति ध्यानीं मनीं नित्य गातां । हरे रोग पीडा दरिद्रासि नाशी । नमस्कार हा० ॥ ८ ॥ करोंनी मनीं निश्चयो अष्टकाचा । कराहो जनीं पाठ दत्तात्रयाचा । करी माधवाच्या सुता दास दासीं । नमस्कार हा० ॥९॥

## शुक्रवार

तुझिया वियोगें जीवत्व आलें । शरीरयोगें बहु दु:ख झालें । अज्ञान दारिद्र माझें सरेना । तुजवीण रामा मज कंठवेना ॥१॥ परतंत्र जीणें कंठू किती रे । उदास माझ्या मनि वाटतें रे । ललाटरेखा तरि पालटेना । तुज० ॥ २ ॥ जडली उपाधी अभिमान साधी । विवेक नाहीं बहुसाल बाधी । तुझिया वियोगें पळही गमेना । तुज० ॥३॥ विश्रांति नाहीं अभिमान देहीं । कुळाभिमानें पडलों प्रवाहीं । स्वहीत माझें होतां दिसेना । तुज० ॥४॥ संसारसंगें बहु पीडलों रे ।

कारुण्यसिंधू मज सोडवी रे । कृपाकटाक्षें सांभाळि दीना । तुज० ॥५॥ विषयी जनानें मज लाजवीलें । प्रपंचसंगें आयुष्य गेलें । समयीं बहु क्रोध शांती घडेना । तुज० ॥६॥ सुदृढ झाली देहबुद्धी देहीं । वैराग्य कांहीं होणार नाहीं । अपूर्ण कामीं मन हें विटेना । तुज० ॥७॥ निरुपणीं हे सद्वृत्ति होते । स्थलत्याग होतां सर्वेंचि जाते । काय करूं रे क्रिया घडेना । तुज० ॥८॥ जय जय दयाळा त्रैलोक्य पाळा । भव-सिंधुहारी मज तारि हेळा । स्वामीवियोगें पळही गमेना । तुज० ॥९॥ आम्हां अनाथा तूं एक दाता । संसारचिंता चुकवी समर्था । दासा मनी आठव वीसरेना । तुजवीण रामा मज कंठवेना ॥ १० ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

## शनिवार

उदासीन हा काळ जातो गमेना । सदा सर्वदा थोर चिंता शमेना । उठे मानसीं सर्व सोडून जावें ।

रघूनायका काय कैसे करावे ॥ १ ॥ जनीं बोलतां बोलतां वीट वाटे । नसे अंतरीं सूख कोठें न कंठे । घडीनें घडी चित्त कीती धरावें । रघूनायका० ॥ २ ॥ बहु पाहतां अंतरीं कोंड होतो । शरीरास तो हेत सोडोनि जातो । उपाधीस देखोनि वाटें सरावें । रघूनायका० ॥३॥ अवस्था मनीं होय नाना परीची । किती काय सांगू गती अंतरींची । विवेकेंचि या मानसा आवरावें । रघूनायका० ॥४॥ म्हणे दास ऊदास झालों दयाळा । जनीं व्यर्थ संसार हा वायचाळा । तुझा मी तुला पूसतों सर्व भावें । रघुनायका० ॥५॥

(२)

तुझा भाट मी वर्णितों रामराया । सदा सर्वदा गाय ब्रीदें सवाया । महाराज दे अंगिचें वस्त्र आतां । बहू जीर्ण झाली देहबुद्धि कथा ॥ १ ॥ रामदूत वायु–सुत भीम–गर्भ जुत्पती । जो नरांत वानरांत भक्तिप्रेम व्युत्पती । दासदक्ष स्वामिपक्ष निजकाजसारथी । वीरजोर शीरजोर धक्क धिग मारुती ॥२॥

## रविवार

असंख्यात रे भक्त होऊन गेले । तिहीं साधनांचें वहु कष्ट केले । नव्हे कार्यकर्ता भुमीभार झालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ।।१।। वहु दास ते तापसी तीर्थवासी । गिरीकंदरीं भेटि नाहीं जनांसी । स्थिती ऐकतां थोर विस्मीत झालों । तुझा दास० ।।२।। सदा प्रेमळासी तया भेटलासी । तुझ्या दर्शनस्पर्शनें पुण्यराशी । अहंता मनीं शद्वज्ञानें बुडालों । तु झा दास० ।।३।। तुझ्या प्रीतिचे दास निर्माण झाले । असख्यात ते कीर्ति बोलोनि गेले । बहु धारणा थोर चकेत झालों । तुझा दास० ।।४।। बहुसाळ देवालयें हाटकाचीं । रसाळा कळा लाघवें नाटकाचीं । पुजा देखतां जाड जीवीं गळालों । तूझा दास० ।। ५ ।। कितेकीं देह त्यागिले तूजलागीं । पुढें जाहले संपत्तीचे विभागी । देहदुःख होतांचि वेगें पळालों । तुझा दास० ।।६।। किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती । किती धर्मसंस्थापना अन्नशांती । पस्तावलों कावलों तृप्त

जालों । तुझा दास० ॥ ७ ॥ सदा सर्वदा राम सोडूनि कामीं । समर्था तुझे दास आम्हीं निकामी । बहु स्वार्थबुद्धीने रे कष्टवीलो । तुझा दास ॥ ८ ॥ जयजय रघुवीर समर्थ ।

## पाळणे

निजसुख पाळणा, पाळणा, हालविते मी कृष्णा, क्षणभरि करि शयना, करि शयना, लागो दे तुज नयना ॥ ध्रु ॥ चंदन काष्ठाचा, काष्ठाचा, रंगित भवरंगाचा । जडीत रत्नांचा, रत्नांचा, वर चेंडू मोत्याचा ॥१॥ कळस सोन्याचा, सोन्याचा, चौकोनी रूप्याचा ॥ साखळदंडाचा, दंडाचा, मंजुळ शद्ब-सुखाचा ॥ २॥ दोरी निजहातीं, निजहातीं, तुजला गात्ती गीतीं । सखया हालविती, हालविती, घे बाळा विश्रांति ॥ ३ ॥ ऐशा व्रजवाळा, व्रजवाळा, हालविती गोपाळा । त्रिवक प्रभुलीला प्रभुलीला, वर्णित वेळो-वेळां ॥४॥

(२)

जो जो जो जो रे श्रीरामा ।
निजसुखगुणविश्रामा ।।ध्रु० ।।
ध्याती मुनियोगी तुजलागीं ।
कौसल्यावोसंगीं ।।१।।
वेदशास्त्रींची मति जाण ।
स्वरूपिं झाली लीन ।।२।।
चारी मुक्तींचा विचार ।
चरणीं पाहती थोर ।।३।।
भोळा शंकर निशिदिनीं ।
तुजला जपतो मनीं ।।४।।
दास गातसे पाळणा ।
राम लक्ष्मणा ।।५।।

(३)

आसन हाकि कुळ्ळिरिसिदवनु । नासिकाग्रदृष्टि निल्लीसिदवनु । बीसुव वायुव तुंबीसिदवनु । इंथा

सूसुमुत्तिन मळेगरिसिदवनु ।। जो जो० ।।१।। आरू-चक्रदमेले अरडिसिदवनु ।। भेरी झागुटि ताळा भोऱ्याडसिदवनु । वीरुव त्रिदळ साधन तोरिदनु । इंथा मुरूकोटिप्रभा बेळक तोरिदनु ।।२।। सहस्रदळ-दमनिय पोगिसिदवनु । जीवब्रह्मानंद सुखद उणिसिदनु । केवळ सुषुम्नमार्गं तिळिसिदनु । नम्म देव चिदानंद ताने अनसिदनु ।।३।।

(४)

देहविद्दु देहविल्लधांग इरबेकु । देहद गुणगळू तिळिदिरबेकु । मनसिन इंद्रियगळू दूरीरबेकु । हींगं दिनदिनक अनुभव तिळिदिरबेकु ।।जो जो० ।।१।। मातुइद्द मातु इलधांगिरबेकु । मातिन मजकूर तिळिदिरबेकु । पातकर गेळेंतन दूरीरबेकु । इंथा नीतिमार्गक्के नेटागिरबेकु ।।२।। कण्णु इद्दु कण्णु इलधांगिरबेकु । कण्णिन कळेगळु तिळिदिरबेकू । हुण्णिवि चंद्रमन हागे उदगिरबेकु । नम्म देव चिदा-नंदन हागे इरबेकु ।।

एद्द घळिगि मोदलु गुरुविन नेनेसि । अरविनोळगे नामस्मरणेय हिडिसि ।। मरविन देहक्के बोधव माडिसि । हिंग दिनदिनक आत्मन कैय सेरिसि ।। १ ।।
जो जो० ।। मरु माडबेकु चित्त पालट । आरू माडबेकु अवन कैवास । आग तिळीयोदु योगि मनि आट । इदर खून तिळियबेकु गुरुविन गुरुत ।। २ ।। पापद मनियोंदु तोंळेयिसिदवनु । पुण्यद मनियेंदु तिळिसिदवनु ।। नाम अमृत सार उण्णिसिदवनु । निश्यनेमदोळगे निराकार तोरिदनु ।।३।। मनसिन ओढि कडियि-सिदवनु । कनसिन प्रकार एन्निसिदवनु ।। मासमासके ताने पालटादनु । नम्म गुरुविन मग गुरियागि तोरिदनु ।।४।। वस्तु ताने आद मस्तकदल्लि । मस्तक मध्यम मूल कोनेयल्लि । सत्य पूरेंबो शिव मंत्रदल्लि । अल्लि चित्त कूडितु नम्म शिवन भेटचागि ।। ५ ।। बाल हुट्टिद बालेव उदरल्लि । जोगुळ हाडेवु अवन हेसरल्लि ।। भोगद गुणगळु नीगिदवल्लि । नम्म योगिय तोट्टिल तूगिरे ब्यागदलि ।। ६ ।। मुत्तिन मूगुति

मुगिनल्लिट्टु । वस्तु बालन तोट्टिल तूगुता ।। अनूभविके-रेल्लरु कूडिरेव । इंथ सृष्टियोळग शिवन तोट्टिल तूगूता ।।७।। अप्प कोट्टनु एनगं ओप्पुव मगन – तप्पगोडदे निम्म जोगुळ हाडुवनु ।। सत्तु हुट्टिबरुव जन्म कडिदवनु । नित्य नित्य कालदल्लि निम्मने भजीसुवेनु ।। ८ ।। जोगुळ हाडवु नोडुत अवन – कंडेंवीग नम्म वस्तू बालन्न ।। भैलिगे मुडचट्टू इल्लदे हुट्टयान । इंथ रामरसदिंद काम हूट्टिदनु ।।९।। गुरुविन दयदिंद माडिद पदवु । अरविट्टु तिळीदवरिगे आदीतु वरवु ।। वरविल्लदवरिगे मायाद मलवु । इथ कायदोळु इरुववन तिळिदु पारागु ।। १० ।। जो जो नम्म गुरुविन हाडि । जो जो सत्य साधुरन पाडि ।। जो जो देव सांवन नोडि नम्म उमदि गुरुविन नेनिसिकोंडयाडि ।।११।। जो जो ।।

## पंचपदी

प्रस्तुत नेमावलीची पहीली प्रत तयार होणेपूर्वी चिमड मठाच्या भजना पैकी इंचगेरीस म्हली जात असतती पांच पदें :

### पद १ लें

भज सद्गुरुराजं भज श्रीगुरुराजं ।।
त्यज त्यज भवजंजालं मायागुणशीलं ।।ध्रु.।।
सत्पदचित्पदरूपं । अखिलानंदस्वरूपं ।।
अगणिततेजोऽमूपं । नीरांजनदीपं ।। १ ।।
दृष्ट्वा दृश्यं व्योमं । पीतं शुभ्रं ताम्रं ।।
नीलं धवल श्यामं । अभिनवनवरंगं ।।२।।
गुप्तागुप्तस्वरूपं । दृष्ट्वा नाशनपापं ।।
हृत्वा भवभयतापं । श्रुतिगर्भितसोपं ।। ३ ।।
घंटाकिणिकिणिनादं । सिंहं शंखं नादं ।।
भेर्यादिकमहानादं । अनुभव मन लुब्धं ।।४।।
मुनिजनमानसहर्षं । मायागुण आकर्षं ।।
शोघनमार्गशीर्षं । तव पुराणपुरुष ।।५।।
इति स्तोत्रं पठ श्रुत्वा । पावनदासजीवित्वं ।
पापं सर्वं हृत्वा । भवभय नाश त्वम् ।।६।।

## पद २ रें

सद्गुरु चिद्घन तुजला । आलों शरण मी तारी मजला ॥ जय गुरु जय गुरु जय गुरु जय । जय गुरु जय गुरु जय गुरु जय ॥ ६६०॥ श्रुतिस्मृति तुजला गाती । परि ती आजवरी न होय पुरती ॥ १ ॥ ॥जय॥ शेष सहस्रमुखीं वर्णितां । परि ती आजवरी न होय पुरती ॥ २ ॥ ॥जय॥ पहा वागीश्वरी तुज स्तविती । परि ती आजवरी न होय पुरती ॥३॥ संत सज्जनीं वर्णिलें बहू । ऐसा तूं एक देवाधिदेवू ॥ ४ ॥ पाहूं जातां तुमचा अंत । नलगे म्हणुनी तुम्ही अनंत ॥ ५ ॥ जाणुनी जे जन धरितील पंथ । ते ते झाले तव पदीं संत ॥ ६ ॥ सचराचर तूं निर्मिता । सर्वावरती तुमची सत्ता ॥७॥ साधकाचे पुरवूनि कामा । तूंचि सहज करिसी निष्कामा ॥ ८ ॥ या दासा तव पदीं प्रेमा । देऊनि करिसी मला उत्तमा ॥ ९ ॥ जय गुरु जय गुरु ॥

## पद ३ रे

प्रार्थना ऐका माझी । गुरुराया समर्था ।

त्रिभुवनीं तूचि थोर । दीनजन उद्धरिता ॥१॥
सद्बुद्धि दे मजला । दुर्बुद्धिचा वीट आला ।
कामादि वैरि वारी । करि निष्काम मजला ॥२॥
वासना मनिं वसली । कधीं निघेनासी जाहली ।
कोठवरी तिसि भांडू । मति माझी थकली ॥३॥
मोहमाया ममता भारी । गांजिताति परोपरी ।
यांतूनि सोडवि बा । तूंचि माझा कैवारी ॥४॥
निद्रा ही रांड खोटी । नित्य लागलीसे पाठीं ।
आयुष्य व्यर्थ गेलें । पाहूं नेदि जगजेठी ॥४॥
देहभाव बहु खोटा । मज करुनि करंटा ।
देशोधडि लावियले । अन्न न मिळे पोटा ॥६॥
ऐसे हे अनंत गुण । गांजिताति कठीण
यांतूनि कोण मजला । सोडविल बा तूजविण ॥७॥
प्रार्थना परिसावी । गुरुराया गोसावी ॥
दुर्गुण वारुनिया । द्यावी सायुज्यपदवी ॥८॥
दासासि संरक्षा । कामधेनु कल्पवृक्षा ।
आपुले ब्रीद रक्षा । पुरवी माझी अपेक्षा ॥९॥

पद ४ थें

हेंचि दान देई स्वामी । राहो मन नित्य नामीं ॥१॥
तुझी सेवा अखंडीत । घडो, रूपीं जडो चित्त ॥२॥
अर्हानिशीं संतसंग । घडो मज हा प्रसंग ॥३॥
दुरितकानन दहन करा । पुण्यरूप वैश्वानरा ॥४॥
शिरीं ठेऊनीया हात । दासा करिसी जीवन्मुक्त ॥५॥
तूंचि माता पिता । तूंचि माझी भगिनी भ्राता ॥
तूजविणें चित्ता । नावडेची दुसरें॥६॥
तूंचि माझें कुलदैवत । तूंचि माझी गणगोत ।
तूंचि माझें वित्त । नावडेचि दुसरें ॥७॥
तूंचि माझें प्रेमसुख । तूंचि माझें निरसी दुःख ।
तूजवीणें देख । नावडेचि दुसरें ॥८॥
तूंचि दासाचा सारथी । तूंचि माझी भागीरथी ।
तुजविणें गुरुमूर्ति । नावडेचि दुसरें ॥९॥

पद ५ वे

आता फार काय बोलूं तुम्हांपुढें ।
पुरे कर्मझाडे भोगणें ते ॥

भोगणें तें सुख उचित या जीवा
पुरवावी केशवा आस माझी ।।
माझी आस तुम्ही करावी सफळ ।
आतां उतावीळ जीव झाला
झाला जीव कष्टी तुजविण झुरे
पुरे आतां पुढे गर्भवास ।।
गर्भवास माझा चुकवी बा दयाळा ।
विनवितो कृपाळा परिसा दासा ।

## नारायण स्तोत्रम्

।। श्री गणेशाय नम : ।।

सप्ताहात पोथीवाचन सुरु करण्यापूर्वी म्हणावयाची स्तोत्रें

नारायण नारायण जय गोविंद हरे ।।
नारायण नारायण जय गोपाल हरे ।। ध्रु. ।।
करुणापारावर वरुणालयगंभीर ।। २ ।।
यमुनातीरविहार धृतकौस्तुभमणिहार ।।३।।

पीतांबरपरिधान सुरकल्याणनिधान ॥४॥

मंजुलगुंजाभूष मायामानुषवेष ॥५॥

राधाऽधरमधुरसिक रजनीकरकुलतिलक ॥६॥

मुरलीगानविनोद वेदस्तुतभूपाद ॥७॥

बर्हि-निबर्हापीड नटनाटकफणिक्रीड ॥८॥

वारिज भूषाभरण राजीव-रुक्मिणि-रमण ॥९॥

जलरुह-दल-निभ-नेत्र जगदारंभक-सूत्र ॥१०॥

पातक-रजनी-संहर करुणालय मामुद्धर ॥११॥

अंध-बक क्षयकंसारे केशव कृष्ण मुरारे ॥१२॥

हाटकनिभपीतांबर अभयं कुरु मे मांवर ॥ १३ ॥

दशरथ राजकुमार दानवमदसंहार ॥ १४ ॥

गोवर्धन गिरिरमण गोपीमानस हरण ॥१५॥

सरयूतीर-विहार सज्जन ऋषिमंदार ॥ १६ ॥

विश्वामित्रमखत्र विविधपरा सुचरित्र ॥ १७ ॥

ध्वज वज्रांकुश पाद धरणीसुत सहमोद ॥१८॥

जनक सुता प्रतिपाल जय जय संस्मृतिलील ॥ १९ ॥

दशरथ वाग्धृतिभार दण्डक वन-संसार ॥२०॥

मुष्टिक–चाणूर–संहार मुनिमानसविहार ।।२१।।

बालिविनिग्रह–शौर्यंवर सुग्रीवहितार्यं ।। २२ ।।

मां मुरलीकर धीवर पालय पालय श्रीधर ।।२३।।

जलनिधि–वन्धन–धीर रावणकंठविदार ।। २४।।

ताटीमद–दलनाढ्य नट–गुण विविध–नाढ्य ।। २५ ।।

गौतम पत्नीपूजन करुणाधनावलोकन ।। २६ ।।

संभ्रम–सीताहार साकेत–पुर–विहार ।।२७।।

अचलोधृति–चंचत्कर भक्तानुग्रहतत्पर ।।२८।।

नैगमगान–विनोद–रक्षःसुत–प्रल्हाद ।।२९।।

भारति–यतिवर–शंकर नामामृत मखिलांतर ।।३०।।

नारायण नारायण जय गोविंद हरे ।।

नारायण नारायण जय गोपाल हरे ।।

इति श्रीमत् शंकराचार्यं बिरचित नारायण स्तोत्रम संपूर्णम् ।।

# निर्वाण षटक्

मनोवुध्दयहंकार चित्तानिनाहं

न च श्रोत्रजिव्हे न च घ्राणनेत्रे ।
न च व्योमभूमिर्न तेजो न वायुः
चिदानन्दरुपः शिवोऽहम् शिवोऽहम्॥१॥

न च प्राणसंज्ञो न वै पञ्चवायुर्
न वा सप्तधातुर्न वा पञ्चकोषः ।
न वाक् पाणिपादौ न चोपस्थवायू
चिदानन्दनरुपः शिवोऽह शिवोऽहम् ॥२॥

न मे द्वेषरागौ न मे लोभमोहौ
मदो नैव मे नैव मात्सर्यभावः ।
न धर्मो नचार्थो न कामो न मोक्षः
चिदानन्दरूपः शिवौऽहं शिवौऽहम् ॥३॥

न पुण्यं न पापं न सौख्यं न दुखम्
न मन्त्रो न तीर्थं न वेदा न यज्ञाः ।
अहं भोजनं नैव भोज्यं न भोक्ता
चिदानन्दरूपः शिवौऽहं शिवोऽहम् ॥४॥

न मे मृत्युशङ्का न मे जातिभेदः

पिता नैव मे नैव माता न जन्म: ।
न बन्धुर्न मित्रं गुरुर्नैव शिष्य:
चिदानन्दरूप: शिवोऽहं शिवोऽहम् ।।५।।

अहं निर्विकल्पी निराकाररूपी
विभुर्व्याप्य सर्वत्र सर्वेन्द्रियाणि ।
सदा मे समत्वं न मुक्तिर्न बन्धः
चिदानन्दरूप: शिवोऽहं शिवोऽहम् ।।६।।

इति श्री शंकराचार्य विरचितं
निर्वाण षटकं संपूर्णम् ।।



# सप्तसमासी



श्रीगणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः ।। श्रीगुरुभ्यो नमः । श्रीराम समर्थ ।। आधीं प्रार्थू गजानना । सकळ विद्येचिया प्रधाना । विद्या कला उठती नाना । जयापासुनी ।।१।। तो मंगळमूर्ती सकळांसी । आदि मध्य अवसानासी । सांभाळतो अहर्निशी । निरंतर ।।२।। आतां स्तवूं वेदजनानी । सकळ विद्या जियेचेनी पावती ज्ञानाज्ञान प्राणी । कर्मानुसार ।।३।। भावें विनवूं श्रोतयांसी । जे कां अधिकारी श्रवणासी । जाणती श्रवणवर्मासी । अनुभवानुरूप ।। ४ ।। साष्टांग नमन सद्‌गुरूसी । प्रेमभावें वंदी चरणांसी । जो पार उतरी भवासी । क्षणमात्रें ।। ५ ।। जयजयाजी सद्‌गुरुनाथा । तुझिया पदीं माझा माथा । कृपा करिजे अनाथनाथा । मज दीनावरी ।। ६ ।। जयजयाजी रेवण-सिद्धा । सिद्धामाजीं महासिद्धा । बुद्धि देईजें मज

अबद्धा । करुण्य-शंभो ।।७।। काडसिद्ध योगेश्वर । वास श्रीक्षेत्र करवीर । त्यांते नमी जो नर । तों पावनची ।।८। प्रेमें वंदूं गुरूलिंगजंगमा । तुझा पार न कळे आगमा । मग मी पामर तुझा महिमा । काय जाणे ।।९।। युगानुयुगीं अवतरोनी । भक्तिमार्ग दाविसीं जनीं । बहुत भक्त उपदेशोनी । मोक्षपंथीं चालविसी ।।१०।। द्वापार माजी रेवणसिद्ध । रेणागिरी झाले सिद्ध । तयापासाव काडसिद्ध । अनुगृहीत ।। ११ । काडसिद्धांचें आगमन । सिद्धगिरीस झालें जाण । किती एक दिवस क्रमून । अलिप्त झाले ।। १२ ।। केलें मायेचें मर्दन । काडसिद्ध नाम म्हणून । तेथूनि मरूळसिद्ध आपण । अवतारा घे ।। १३ ।। मरुळसिद्धांचे अनुगृहीत । एकोरामसिद्ध संत । एकोरामापासून होत । पंडिताराध्यसिद्ध ।। १४ ।। एकामागुनी एक सिद्ध । ऐसे झाले पांच सिद्ध । उपदेशोनि अनेक बद्ध । मोक्षा नेले ।। १५ ।। सिद्धावतार गुरुलिंगजंगम ।

त्यांचा अनुग्रह झाला परम । तोचि कथाभाग सुगम । आधीं सांगिजेल ।। १६ ।। निंबरगी नामें एक ग्रामीं । नारायणराव गुरूस्वामी । तयांचे चरित्र वर्णितों मीं । अल्पमात्र ।। १७ ।। महाराज असता लहान । सण पातला फाल्गुन । समर्थ बहुत वेळ खेळून । गृही आले ।। १८ ।। ह्मणोनि वडील बोलिले । रागें समर्थ निघाले । पंढरपुरीं त्वरित पातले । विठ्ठलदर्शना ।।१९।। जैसे दास गेले वनीं । तैसे समर्थ विठ्ठलभवनीं । देउळामाजीं बैसले ध्यानीं । एकाग्रमनें ।। २० ।। ऐसें सप्त दिवस क्रमित । तंव स्वप्न झालें अवचित । सिद्ध-गिरीस जावें त्वरित । आज्ञा जाहली ।।२१।। मग तें सिद्धगिरीस जात । तंव पुराण चाललें क्षेत्रांत । तें ऐकती देऊनि चित्त । हर्षनिर्भर होऊन ।। २२ ।। जंगम-रूपें काडसिद्ध । खुणें संबोधिती सन्निध । जाताचि समर्थ सुबुद्ध । उपदेशिले ।। २३ ।। तेणें जाहले तल्लीन । मग गुर्वाज्ञा घेऊन । निंबरगी ग्रामीं परतोन । येते

जाहले ।।२४।। समजून घेतला गुह्यार्थ। राहती बहुधा अरण्यांत । रामदासापरी समस्त । वेळ क्रमिती ।। २५ । प्रपंच परमार्थ मिळोन । दोन्ही चालविती समान । छत्तीस वर्ष करुनि साधन । सिद्ध जाहले ।। २३ ।। मग लोक उपदेशिले । भक्तिमार्गा लाविले । शतानुशत उद्धारिले । तया ग्रामीं ।। २७ ।। तंव एक ब्रह्मचारी । काशी करुनि पंढरपुरी । जाता राहिले सोनगी नगरीं । निंवरगीसन्निध ।। २८ ।। ब्रह्मचारी आले ऐकुन । लोटांगणें जाती जन । समर्थही भेटीकारण । तेथें आले ।। २९ ।। निर्गुण भक्त समर्थ जरी । सगुण भक्त ब्रह्मचारी । दोघां वाद बहुतांपरी । थोडा वेळ जाहला ।। ३० ।। समर्थगुह्य ठसून मनीं । ब्रह्मचारी लागले चरणीं । उद्धारा मातें ह्मणोनि । दुःखी जाहले ।। ३१ ।। मग समर्थे उपदेशिलें । तेधवां मन तल्लीन झालें । उमदी ग्रामीं राहिले । साधन करुनि ।। ३२ ।। द्वादश वर्षे साधन करितां । साधु

नाम पावले तत्वाता । मग समर्थे दिधली सत्ता । उपदेशावया । ३३ ॥ तंव अनेक जन उपदेशून । भक्तिमार्गातें लावून । साधनसिद्धीस पाववून । मोक्षा नेले ॥ ३४ ॥ भजन गायन नाना उपाय । करोनि स्मरती समर्थपाय । तयांसी नाम रघुनाथप्रिय । प्राप्त झालें ॥ ३५ ॥ उमदीकर देशपांडे एक । सोळा वर्षांचे बालक । तेही झाले सेवक । समर्थांचे ॥ ३६ ॥ लहान असुनी सात्विक । संभावीत आणि तपक । एकनिष्ठ आणि भाविक । देव-अंश ॥ ३७ ॥ तयांचे अंगीं वैराग्य बाणलें । सुदृढ धरिती गुरुंची पाउले । साधन साधीत चालले । एकनिष्ठपणें ॥ ३८ ॥ प्रतिगुरुवारीं येऊन । गुरुच्या चरणीं होती लीन । भेटीवीण न करिती भोजन । प्राणांतींही ॥ ३९ ॥ ऐशीं वर्षे बेचाळीस । न चुके साधन एक दिवस । अंतरीं वसे उल्हास भक्तिविषयीं ॥४०॥ प्रसंग अथवा अडचण येतां। किंवा आनंदी मन असतां न चुकविले साधन

तत्वतां । महासमर्थे ।। ४१ ।। तया समर्थाचे कथन । पुढील समासी करीन । तुम्ही श्रोते विचक्षण । होऊनि ऐका ।। ४२ ।। समर्थाचे चरित्र कथन । गहनाहूनि अति गहन । म्या अबुद्धें तें लिहून । किंचिन्मात्र ठेविलें ।। ४३ ।। त्यांत काय शुद्ध काय अशुद्ध । मज कळेना शुद्धाशुद्ध । मी आहे परम बुद्ध । सर्वामध्यें ।। ४४ । बोलतां नये तें कथिलें । सांगतां नये तें सांगितलें । न्यून पूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ।। ४५ ।। अगाध समर्थ महिमान । केंवी वर्णू शके अज्ञान । परि समास केला पूर्ण । म्या मतिमंदे ॥ ४६ ॥ इति श्री गुरूपरंपरा-निरुपण नाम प्रथमः समासः ।।

श्री गणेशाय नमः ।। श्रीगुरुभ्यो नमः ।। श्रीराम समर्थ ।। तुझा महीमा गातां श्रीपती । श्रुतिशास्त्राची कुंठीत मती । पार न कळे मग निश्चितीं । नेति नेति बोलती ।। १ ।। नाहीं रूप नाही नांव । त्रिगुणरहित

निरावेव । परि भक्ताचिया सप्रेमभावा । सगुण लाघव दाविसी ॥ २ ॥ नाना अवतार धरोनि हरी । भक्त रक्षिले बहुतांपरी । सत्कीर्ती प्रगटली चराचरीं । पुराणांतरी व्यासोक्त ॥३॥ आता कलियुगामाजीं साचार । उमदीमहाराज अति थोर । तया माझा नमस्कार । साष्टांगभावें ॥ ४ ॥ मागें साधुसंत झाले । तयासारिखेच अवतरले । जगामध्यें प्रसिद्ध झाले । महा साधू ॥ ५ ॥ समर्थांचें उमदी स्थान । निंवरगी साधू होते महान । तयांच्या उपदेशें प्राण । झिजवले समर्थे ॥ ६ ॥ समर्था नांव भाऊराव । एकनिष्ठ गुरुपदीं भाव । म्हणूनिया झालें नांव । प्रसिद्ध जगीं ॥ ७ ॥ 'भा' म्हणिजे दृश्यभास । दृश्यभासीं वस्तुभास । वस्तुभासी तल्लीनतेस । पावती सदा ॥ ८ ॥ 'ऊ' म्हणिजे उपाधी । निरसनें परमार्थातें साधी । तयापुढें षड्गुणशुद्धी । आपोआप ॥ ९ ॥ 'रा' म्हणिजे आठवण । असून नसल्यासारिखे जाण । जगासारिखें राहणें पूर्ण । परो

निराकार ॥ १० ॥ 'व' म्हणिजें इहलोकींचे देव। साकारासारिखे अवयव। परंतु निराकार हाचि भाव। व्यक्त होई॥ ११ ॥ जन्म झाला देशपांडे कुळीं। जें कां विधीनें लिहिलें भाळीं। पुढें गुरूप्रसादे तात्काळीं। ललाटरेषा पुसली ॥ १२ ॥ उगवलें अनंत जन्मींचें प्रारब्ध। स्वरूप लाधलें स्वतःसिद्ध। स्वरूपदर्शन होतां बद्ध-। वार्तांचि उडाली ॥ १३॥ असो हे सर्व पुढें झालें। परी बालपणीं काय वर्तलें। आणि साधन कैसे केलें। तेंचि आतां निरूपिजेल ॥ १४ ॥ यांचें वडील बंधू दोघेंजण। नानासाहेब आणि दाजीबा जाण। रघुनाथप्रियांनीं कृपा करून। अनुगृहीत केले ॥ १५ ॥ बालपणीं भाऊराव। निर्गुणज्ञान मानिती वाव दाजिबांची गुरुसेवा सर्व। लटकी मानिती ॥ १६ ॥ परी। करिती सगुण उपासना। मारुति नित्य पूजिती जाणा। तेथें भेटती रघुनाथप्रियांना। नित्यनेमेंकरूनि ॥ १७ ॥ त्यांस रघुनाथप्रिय नमस्कार॥ स्वयेंचि घालोनी

साचार । अंतर वेधिती सत्वर । भक्तिमार्गी ओढिती ॥१८॥ निंबरगी गुरूंस शरण । जावया उपदेशिती जाण । त्यांस निंबरगीस घेऊन । स्वयेंच जाती ॥१९॥ निंबरगीमहाराज अति थोर । धीर उदार आणि गभीर । दूरदृष्टीने करोनि विचार । साधुबुवास आज्ञा- पिती ॥२०॥ आज्ञा करिती साधुकारण । तुम्हीच अनुग्रह करावा म्हणून । साधुबुवांनी मान्य करून । भाऊराव उपदेशिले ॥२१॥ अनुग्रह घेवोनि सत्वरी । राहिले उमदीभीतरीं । त्रिकाल साधन निर्धारी । करीत राहती ॥२२॥ प्रपंच परमार्थ दोन्ही । चालविती नेमेंकरुनी । परमार्थचि स्वार्थ मानुनी । साधन वाढविती ॥ २३ ॥ कुलव्यवसाय करिती । लोकांचीं मनें सांभाळिती । म्हणून जडली प्रीति । मर्यादेवेगळी ॥ २४ ॥ लोकांवरी करिती उपकार । उपकारची हेऊ पाहे अपकार । जनसमूहाचा त्रास फार । होऊं लागे ॥ २५ ॥ प्रापंचिक लोक येती । प्रापंचिकचि गोष्टी

बोलती । उगाच कालक्षेप करविती । व्यवसायभरे ॥ २६ ॥ तेणें झाला उदंड त्रास । भाऊराव चुकविती जनांस । जाऊं लागती वनास । साधन करावया ॥ २७ ॥ मध्यान्हीं पोथी वाचती । श्रवणमननी निमग्न होती । नेमस्तपणें चुकविती । जनत्रास अवघा ॥ २८ ॥ रात्रीं जनांसी भेट देती । शिघ्रचि कामें आटोपती । प्रपंची मलिन न करिती । परमार्थवुद्धि ॥ २९ ॥ वाढत चालला अनुभव । विवेकवैराग्या मिळे ठाव । वैराग्यभरें प्रपच वाव । होऊ लागे ॥ ३० ॥ उदंड वैराग्य उपजलें । मामलतीसी नाकारिलें । परमार्थ उत्तम म्हणोनि राहिलें । स्वतंत्र रीतीं ॥ ३१ ॥ जन बहुत निंदा करिती । यांचा लिंगायत गुरु म्हणती । कोणी म्हणती चेटक निश्चिती । गुरूनें केलें ॥ ३२ ॥ श्वशुराचा होतसे त्रास । संबंधी धरिती अविश्वास । सर्व ढोंग म्हणूनि त्यांस । बहुत पीडा करिती ॥ ३३ ॥ परी अज्ञांसि न कळे विचार । नाहीं आत्मज्ञानाचा साक्षात्कार । ब्राह्मण

कोण याचा निर्धार । केवि कळे ।। ३४ ॥ वर्णाचा गुरु ब्राह्मण । ऐसें असें वचन । हें सर्वथा सत्य जाण । परी ब्राह्मण कोणा म्हणावें ॥ ३५॥ ब्रम्ह जानाति ब्राह्मण । जो ब्रह्मविद असे जाण । जो आत्मज्ञान जाणे पूर्ण । तयासीच ब्राह्मण म्हणावें ॥ ३५ ॥ एवं तुकाराम ब्राह्मण । आणि चोखामेळाही ब्राह्मण । ब्राह्मण नसतां ब्राह्मणंमन्य । गर्दभ जाणावे ।। ३७ ।। असो ऐसी निंदा होतां । ज्याचें धैर्य न चळे सर्वथा । तोचि जाणावा तत्त्वतां । देवपुरुष ॥ ३८ ॥ इकडे साधन चालिलें । इकडे वैराग्य अंगीं भरलें । तेणें सामर्थ्य आलें । उदंड अंगीं ॥ ३९ ॥ एकदां गुरुसन्निध असतां । आणि साधन चाललें असतां । भोंगा मांडी पोखरी तत्त्वतां । परी अणुमात्र ढळेना ॥ ४० ।। रांनीं वनीं सर्प वृश्चिक । सन्निध येती जाती देख । अथवा अंगावरी चढती निःशंक । परी भीति असेना ॥ ४१ ॥ अथवा पाऊसें-भिजविलें । किंवा आतपें पोळलें । किंवा शीतें शरीर

भेदिलें । तरी अचळ ।। ४२ ।। अठरा वरुषें उभें राहून । तप केलें निद्रा जिंकून । तेणेंचि झालें पुण्यवान । सर्व जगासी ।। ४३ ।। असो ऐसें साधन करिती । शनिवारीं गुरूस भेटती । सद्‌गुरुची सेवा करिती । नाना-प्रकारें ।। ४४ ।। गुरुवरी निःसीम भक्ती । त्यांच्या पादरक्षा उचलिती । निद्य कामासही न याहती । मागें पुढें ।। ४५ ।। त्यांचें गुरुबंधु असती । रामभाऊ चिमडीं राहती । त्यांनींही साधन चालविलें निश्चितीं । महायत्नें ।। ४६ ।। उभयतांची निष्ठा पूर्ण दृढ धरिती सद्‌गुरुवचन । त्याहून अन्य प्रमाण । मुळींच न मानिती ।। ४७ ।। रामभाऊनीं चालविला चिम्मड पंथ । यानींही वाढविला परमार्थ बहुत । आज्ञा घेऊनि विख्यात । करिती नाम गुरूचें ।। ४८ ।। असो गुरूचें देहांतसमयीं । भाऊराय सन्निध असतां पाही । परमार्थ वाढवावा लवलाहीं । म्हणोनि आज्ञा जाहली ।। ४९ ।। गुरुदेहान्त झालियावरी । यांसी चैन न पडे

क्षणभरी । त्या प्रेमदुःखाची सरी । कोठेंचि नसे ।। ५० ।। असो, नंतर विचार केला । कीं परमार्थ पाहिजे वाढविला । म्हणोनि साधिती साधनाला । अहर्निशीं ।। ५१ ।। गुरुकृपेनें भाग्य फळलें । पूर्ण अद्वैत मनीं ठसलें । तेणें समूळ उडोनि गेलें । मायाजाळ ।। ५२ ।। मनीं उदात्त हेतू धरली । कीं गुरुंची व्हावी कीर्ती । देवालय बांधून मूर्ति । आंत स्थापावी ।। ५३ ।। आणि विठोबास नवस केला । भक्तिमार्ग पाहिजें वाढला । मग पंढरीस येऊन तुम्हांला । लोटांगण घालीन ।। ५४ ।। सद्गुरूची पूर्ण कृपा होतां । मग करावी नलगे चिंता । विश्वास साधन गुरुकृपा मिळतां । काय उणें ।। ५५ ।। ऐसा मिळवोनि अनुभव । मग वाढविती समुदाव । कर्नाटक धुंडोनि सर्व । भक्तिमार्ग वाढविती ।। ५६ ।। लोक उद्धराया अवतरले । भक्तिमार्गासि लाविले । भूमंडळी ख्याती पावले हे । समर्थ ।। ५७ ।। गांवोगांवी जाऊन भजन साधन करुन । नानाप्रकारे जन ।

संतुष्ट केलें ॥५८॥ तयांचे एक प्रेमळ भक्त । अंबुराव नामें विरक्त । तेथे येवून स्वस्थ । साधन करीत राहती ॥ ५९ ॥ सदा हिंडती भुमिवरी । सप्त्यास येती हिचगेरी । भजन लाविती परोपरी । नाना यत्नें ॥ ६० ॥ नीच जाती अथवा संस्थानिक । यांनी पाचारिले असतां देख । त्यांचा भाव पाहोनि नेमक । गृहा जाती ॥ ६१ ॥ परमार्थी नाहीं लहान थोर । विद्या धन वर्ण विचार । परी प्रपंची वागती साचार । ज्याचे त्यापरी ॥ ६२ ॥ प्रपंचीं जाणती पृथक्करण । परमार्थी जाणती एकीकरण । अंत्यज गुरुबंधूसही लोटांगण । प्रेमें घालती ॥ ६३ ॥ बाष्कळांस घालिती नमस्कार । वादास न देती थार । नेमकांस सांगती बहुतर । अनुभव आपुला ॥ ६४ ॥ अथवा जो कां अनन्यशरण । तयांसही अनुभव सांगती जाण । अनुभवापुढें शब्दज्ञान । फिकें पाडती ॥ ६५ ॥ ओझें कदापि न घालिती । शिष्यांसि स्वल्पही न मागती । वहुरूपी वहुरंगी मायेप्रति । ठाव नसे ॥ ६६ ॥

कत्येक बाधा घालविती । संकटी उपाय सांगती । व्याधिग्रस्तांस बरे करिती । नामौषधें ।। ६७ ।। त्रिकाळ पुराण भजन साधन । कदापि न चुकविती जाण । आनंदसागरीं आपण मग्न । वारंवार होती ।। ६८ ।। कित्येंक श्रोतेजन येती । ते पुराण भजनचि ऐंकती । परी त्यांसीं न कळे साधनस्थिती । नाम-धारकांऐसी ।। ६९ ।। पुराण भजन म्हणजे शद्वज्ञान । साधन म्हणजे निःशद्वज्ञान । वरिवरी पाहतां निःशद्वज्ञान । केंवी कळें ।। ७० ।। आपण महंती न करिती । परी सर्वत्र चमत्कार होती । कां तें पुण्यमार्गे चालती । म्हणोनिया ।। ७१ ।। ज्ञानास सिद्धींचा विटाळ। ऐसें वदती वेळोवेळ । परी तो गोविंद कृपाळ । भक्तकाज करीतसे ।। ७२ ।। साधनें साध्य झालें सर्व । तथापि करिती साधन उपाव । कीं साधकां यावा उत्साह । साधन करवाया ।। ७३ ।। संदेहासि जिंकिले । आणि भयासि पळविलें ।

अनिर्वाच्य सुख प्राप्त झालें । साधन पंथे ।। ७४ ।। असो तया साधूंचीं लक्षणें । लिहिता होत असे उणें । मी मतिमंद काय जाणे । नाना कळा ।। ७५ ।। समर्थाचे वर्णन । मी काय करीन दीन । अनुगृहीत मी म्हणून । एवढें वर्णिलें ।। ७६ ।। होईल कृपा जरी सत्वर । पुढतीं लिहोंन साचार । नातरी मी पामर । इतुकें पुरें ।। ७७ ।। इति श्रीमत्समर्थ भाऊरावमहाराजचरित्रनिरूपणं नाम द्वितीय समास : ।।



।। श्रीगणेशाय नमः ।। श्रीगुरुभ्यो नमः ।। श्रीराम समर्थं ।। जें कां सप्रेम भक्तिचें फळ । कीं सरळ वैराग्याचें मूळ । अथवा ज्ञानाचें अधिष्ठान केवळ । ते हे प्रांजळ सत्कथा ।। १ ।। संसारतप्त भक्त प्रेमळ । आनंदसागरी जाहले शीतळ । त्यांची चरित्रें अति रसाळ । ऐकिली सकळ सज्जनीं ।। २ ।। धन्य तयांची

करणी । मठ बांधिला वनीं । तेथील वर्णन निरुपणीं । सावध ऐका ॥ ४ ॥ योगीराज महासमर्थ । कष्ट करुनि पाहीला परमार्थ । परमार्थ तोचि मुख्य अर्थ दृष्टीपुढे ॥ ४ ॥ जिकडे जातील समर्थ । त्या स्थळीं सर्वहि अर्थ । अर्थ असता अनर्थ । कासया घडे ॥ ५ ॥ ' एकीं मागमागोन घेणें । एकां न मागता देणें " निष्कमभजनें देव उणें । पडोंचि नेदि ॥ ६ ॥ समर्थ जिकडे जाती । तिकडे लोक धावून येती । आलेल्यांचे मन करीती । संतुष्ट बहु ॥७॥ बहु दूर भक्ति पसरली । हिवगेंरीस येती भक्त मंडळी । सप्ता करोती योग्यकाळीं ।। आनंदाने ॥ ८ ॥ मार्गशीर्ष चैत्र माघ मासीं । उत्सव करिती सप्त्यांसी । श्रावणमासीं निश्चयेंसी । साधन वाढविती ॥ ९ ॥ तया स्थळीं चमत्कार । होती तयांचा विचार । शोधुन पहावा साचार । विचारवंतीं ॥ १० । विचार म्हणजें इच्छ हार । न मागता होत साचार । नाना अडचणींचा प्रकार । निघोन जातो ॥ ११ ॥ तया स्थलांचे मोल । करितां होतसे अमोल । रत्न आणि

फोल । सारिखें कैसें ।। १२ ।। तेथे दोन मुखवटें सुरेख । रौप्य आणि ताम्र एक । तया मूर्तींचें कौतुक । पाहतां कळे ।। १३ ।। तेथे मृदंग नाद थोर । पुष्प सुवास संभार । आश्चर्य करिती जन फार । पाहुनिया ।। १४ ।। कित्येक भक्ती बांधिल्या । सभोंवार राहण्या शाळा । तया भुमीची तुळा । मुळींच नसे ।। १५ ।। भक्त त्रिकाळीं भजन करिती । कर्पुरसंभारे आरती करती । जय-जयकारें टाळ्या पिटती । प्रेमभरें ।। १६ ।। दोन रौप्यवेत्रिका असती । त्या देवापुढे ठेवती । सप्ताह प्रसंगी आणती । शोभायमान ।। १७ ।। टाळ मृदंग कित्येक । तीन झंकार घंटा अनेक । पाहुनियां हर्षित लोक । मनामध्यें ।। १८ ।। दिंड्या पताका लाविती । फुलझाडे शोभा देती । मंडपशोभा पाहुनि मती । गुंग होय ।। ११ ।। चहुंकडे पर्वत । मध्ये मठ शोभत । लोक साधनाकरीतां जात । तयांवरी ।। २० ।। जवळी तीर्थें असती दोन । स्नानें करिती सकळ जन । उत्तम जलें

असती पूर्ण । सर्वकाळीं ।। २१ ।। गुरूंच्या पादुका ठेऊन । गुरूलिंगजंगम म्हणून । भक्ती चालविती नमून । तया पुढें ।। २२ शिवलिंगाजवळी गणपतीची ॥ आणि मूर्ती असे बलभीमाची । तेणें शोभा दुणावे साची । मूळ मूर्तींची ।। २३ ॥ चौघडा वाजे समोर । स्त्रिया बसती माडीवर । घंटा टांगिली असे थोर । नादें अंबर भरतसे ।। २४ ।। पालखी निघे तीन रात्री । तयापुढें वाजती वाजंत्री । वाटे कंपायमान धरित्री । नामघोषें ।। २५ ।। गुरुलिंग मूर्ति पालखींत । बैसवुनी बारा अभंग म्हणत । नानापरीचीं वाद्ये वाजत । नाना छंदे ।। २६ ।। पालखीपुढे नाचती । कितीएक भजन करिती । गुरुलिंगजंगम नामें गर्जती । जयजयकारें ।। २७ ॥ पांच प्रदक्षिणा घालिती । मग मूर्ती पूर्वस्थळी ठेंविती । नानापरी आरत्या करिती । महानंदे ।। २८ ।। अन्नसंतर्पण सात दिवस । करोनि भक्त जाती स्वस्थळांस । तया सप्त्यांचा उल्हास । किती म्हणून

वर्णावा ॥ २९ ॥ असो मी मतिमंद अज्ञान पुढील समासीं निरूपण । शिष्यवर्गाचे करीन । श्रोती सावध परिसावें ॥ ३० ॥ माझें लिहिणें साकार । समर्थ असती निराकार । साकार लिहितां चुकें फार । तरी क्षमा मज किजे ॥ ३१ ॥ हें माझें चुकिचें लिहिणें । श्रोतीं गोड मानूनि घेणें । मज दीना न अव्हेरणें । क्षमा करोनि ॥ ३२ ॥ मी महाराष्ट्र भाषीं अजाण । अर्थव्याकरणीं बुद्धीहीन । म्हणून वर्णन संपूर्ण करितां नये ॥ ३३ ॥ मी असे अजाण करंटा । उगाच ओव्यांचा करी पुरवठा । म्हणून हे गुरुश्रेष्ठा । क्षमा केली पाहीजे ॥ ३४ ॥ असो धन्य धन्य हिंचगेरीं क्षेत्र । तेथें जाती ते पवित्र । स्वयें दर्शनें करिती पवित्र । इतर जनांसीं ॥ ३५ ॥ इति श्रीहिंचगेरीवर्णनं नाम तृतीयः समासः ॥



श्रीगणेशा नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीराम समर्थ ॥ जयजयजी उमदीकरा । सकल सद्‌गुण - माहेरा । चरित्र कथावया आज्ञा करा । ब्रह्मानंदा ॥ १ ॥ आज्ञा आपुली शिरसा वंद्य । आपण असा जगद्वंद्य । मनीं स्मरोनी तुमचे पाद । कथा आरंभी मी ॥ २ ॥ तुम्ही निर्गुण निराकार । प्रपंचीं दिसतां साकार । आपणां न लगे संसार । म्हणोनि संसारातीत । ॥ ३ ॥ महाराजांचे अनेक भक्त । परी कोण कोण झाले विरक्त । त्यांची कथा मन सुचित । समर्थ ऐका ॥ ४ ॥ जैसे रामदासशिष्य कल्याण । तैसेचि असती गुणसंपन्न । अंबुराव नामें सुजण । करोनी भक्त ॥ ५ ॥ कल्याण उपमेसी दिधले ॥ त्यांनी बहुत साधन केलें । सात्रनें मुख्य शिष्य झाले ॥ म्हणून साम्य ॥ ६ ॥ हिंचगेरी क्षेत्रीं । जाण । मठ । बांधावया दिधले स्थान । मठामध्यें स्थळ करुन । भक्ति करीत राहीले ॥ ७ ॥ असती अति साधनिक ।

संभावित आणि सात्विक । भक्तिवान आणि भाविक । सर्वोत्तम ॥ ८ ॥ समर्थे पाहून त्यांचे गुण । उपदेशावया अधिकार पूर्ण । दिधला परंतु कोणीही जन । नुपदेशिले ॥ ९ ॥ त्यांनी सांगितले समर्थास । मी आपला दासानुदास । आपण असतां उपदेशास । केंवीं अधिकारी होईन ॥ १० ॥ जैसी रामदासांची शिष्यीण । वेणूअक्का नामें सुजाण । तैसीच समर्थाची पूर्ण । शिवलिंगव्वा नामें ॥ ११ ॥ तयांचे स्थळ जत संस्थान । लहानपणी उपदेश घेऊन । भक्ति करिती तेव्हापासुन । एकनिष्ठपणें ॥ १२ ॥ सदोदित करिती साधन । दृष्टीपुढें आत्मज्ञान । धन्य तयांचें महिमान । मज न वर्णवे ॥ १३ ॥ महाराजांचे खटपटी भक्त । नंद्याप्पा आणि तुकाराम विरक्त । दोघे भावे वर्तत ॥ एकनिष्ठपणें ॥ १४ ॥ नंद्याप्पाचे निवासस्थान । जमखडी नामें संस्थान । अनुगृहीत होऊन । बहुत दिन जाहले ॥ १५ ॥ लिंगायत कुळीं जन्म

बोधानंतर जाणिले वर्म । तेथोनि भक्तीवर प्रेम । अति-शयित ।। १६ ।। नेमनिष्ठें चालती । प्रति सप्त्यास मठीं येती । शोभायमान मठ करिती । सर्व प्रकारें ।। १७ ।। दुसरें नामे तुकाराम । विजापुरी ह्यांचा जन्म । बोधानंतर वधुनी भ्रम । गुरूपदीं लीन झाले ।। १८ ।। असती बहू खटपटी । भक्तिवीण नावडे गोष्टी । सप्ता न चुको एवढी पोटी । आशा थांसी ।। १९ ।। भजन पूजन थाटें करिती । नाना वाद्ये आणविती ।। नाना छंदे प्रेमें नाचती । पालखी पुढें ।। २० ।। चिम्मडीं असती दोन सेवक ।। कबीर अल्लाप्पा एक । विरक्त आणि भाविक । गुह्यज्ञानी ।। २१ ।। तयांचे करावया कथन । वक्रदृष्टिक हेंचि कारण । विवेकी असती परिपूर्ण । म्हणून लिहिलें ।। २२ ।। ककमरी नामें एक ग्राम । तेथील भक्त शंकरेप्पा नाम । बहु शिष्यांमध्ये उत्तम । भक्ती विषयीं ।। २३ ।। तेथील सर्व भक्तमंडळी । विरक्त

मानूनि त्यास त्रिकाळीं । गुरू भाविती वंदिती भाळी । प्रेमें करूनि ॥ २४ ॥ तैसेचि तिकोटेकर रामराव । ज्यासी संसार झाला वाव । त्यांचा समर्थे देखोनी भाव । सदैव आपणापाशीं ठेविले ॥ २५ ॥ जयाचें उपनाव फडणवीस । बाल ब्रह्मचारी पुरुष । उदार विरक्त आणि तापस । गुर्वाज्ञेसी तत्पर ॥ २६ ॥ त्याच ग्रामीं आणखी एक । असती एक भाविक । कवित्वे करिती अनेक । गंगाबाई ॥ २७ ॥ याही भक्तीच्या भुकेल्या । साधनीं सदोदित रंगल्या । आत्मज्ञानीं निष्णात झाल्या । विश्वासबळें ॥ २८ ॥ निंबरगींत असती परमभक्त । नागाप्पा नामें विख्यात । वाद्य गायनीं निष्णात । गंधर्व ऐसे ॥ २९ ॥ निंबरगींत महाराजांचे पौत्र । समर्थांसवे हिंडती सर्वत्र । गुणवंत आणि पवित्र । सर्वांमध्यें ॥ ३० ॥ तैसाचि समर्थांचा एक सेवक । आठ वर्षांचा बालक । लिहितां वाचता कांहीं एक । येत नाहीं ॥ ३१ ॥ पांच वर्षांचा

असतां लहान । तेव्हांचि अनुग्रह झाला जाण । तयें वेळेपासून साधन । नित्य करीतसे ।। ३२ ।। इराप्पा नामें बालक । असे अति भाविक । भजनीं निष्णांत, सात्विक । सर्वांहून ।। ३३ ।। एकदां भजन आइके जरी । न विसरे प्राणांतवरी । नासिकाग्रदृष्टी ठेऊन करी । कामकाज ।। ३४ ।। इतकें लहान बालक । कैसे झालें अति भाविक । हेंचि वाटे कौतुक । सकल जनां ।। ३५ ।। येणेंपरी अनंत लोक । स्त्रियाहि आत्मज्ञानिक । धन्य तयाचे कौतुक । वर्णवेना । ।। ३६ ।। आईसाहेब पटवर्धन । समर्थ कीर्ति ऐकोन । अनुग्रहीत होऊन । भक्ति औत्सुक्ये करिताती ।। ३७ ।। अंतरीं बाणिलें आत्मज्ञान । भक्तीवरी अति मन । धन्य तयांचें महिमान । किती वर्णू ।। ३८ ।। जमखंडी ग्रामी लोकांस । बहुतांसि लाविले भजनास । नेला जन्म सार्थकतेस । हिचगेरी मठ बांधोनि ।। ३९ ।। सोलापुरीं बयाबाई । भक्ति थाटें चालविती पाही ।

उदार भाविक आणि उपकाराविषयीं । सर्वात श्रेष्ठ ॥ ४० ॥ सोलापुरीं भक्त वाढविती । तेणें समर्थांची वाढे ख्याती । नाना लोकास साधनस्थिती । सहजचि प्राप्त होतसे ॥ ४१ ॥ शिष्यांमध्यें ज्ञानी परम । वेदांताचें पूर्ण धाम । नाना विद्या जया सुगम । एकसरें ॥ ४२ ॥ वकील विजापुरीं नरहरराव त्यांस सांकडे भक्ति-ठाव । संपादू इच्छिती आत्मज्ञान नांव । खटपट करिती ॥ ४३ ॥ ज्ञानी बहुत असून । भक्ति चालविती प्रेमेंकरून । धन्य तयाचे महिमान । मी काय वर्णू ॥ ४४ ॥ कित्येक असती शब्द ज्ञानी ते न होती आत्मज्ञानी । परी हे शब्दज्ञान वारुनी खटपट करिती ॥ ४५ ॥ तेरदाळीं जेठमल्ल । भक्तिसामर्थ्य जाहले मल्ल । औदार्याविषयीं त्यासी तुल्य । कोणीच नसे ॥ ४६ ॥ त्यांनीं आत्मज्ञान अनुभविलें । स्वजनांसि भक्तीस लाविले । तेणें बहुत ख्याती पावले । समर्थ तेथं ॥ ४७ ॥ सर्व समासांचा सारांश । द्यावया

नाही अवकाश । पंचभूतीं मुख्य आकाश । तैसेचि मुख्य वर्णितों ॥ ४८ ॥ मागें केले वर्णन । अंनुराव महाराज कोण । विचारवंत तुकवंत म्हणून । तुकोबासमान ॥ ४९ ॥ ते सर्व शिष्यामध्यें श्रेष्ठ । अधिकार सर्वाहुन वरिष्ठ । तैसेचि तयांचे मन स्पष्ट । दूरदृष्टी ॥ ५० ॥ जेवी कृष्णें नखाग्रीं पर्वत । उचलोनि रक्षिले गोकुळ-गोत । नंद्याप्पा भक्तिमार्गास धरीत । तेणेंचि रीति ॥ ५१ ॥ केलें भक्तीचें रक्षण । म्हणून कृष्ण उपमा जाण । भक्तिमार्ग वाढवून । जन्म सार्थक केला । शंकराप्पाचें वर्णन । वागें बोलिले कोठील कोण । भोळा भाव असे म्हणून । सांव उपमा ॥ ५३ ॥ रामराव ब्रह्मचारी । भाविक विरक्त अंतरीं । लक्ष गुरुसेवेवरी । सर्वकाल ॥ ५४ ॥ जैसे होते हनुमंत ॥ तैसेंचि हे कार्य करीत । म्हणून तया उपमा साजत । हनुमंताची ॥ ५५ ॥ आणीक असती कित्येक भक्त सांगों जातां असंख्य । मज ठाउके तेवढे येथ

वर्णिले मूढें ॥ ५६ ॥ मी अज्ञान मतिमंद । मज न समजती नाना छंद । श्रोतीं यांतचि आनंद । मानून घ्यावा ॥ ५७ ॥ असो, ऐसा भक्तिपंथ । सागरापरा वाढला । बहूत मी काय वर्णी तेथ । मंदमती ॥ ५८ ॥
इति श्रीशिष्यावर्गनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥



श्रीगणेशाय नमः ॥ श्री गुरूभ्यो नमः ॥ श्रीराम समर्थ ॥ आतां वदू सत्‌ सभा । जिये सभेसी मुक्ति सुलभा । जेथें जगदीश स्वयें उभा । सप्रेंमभरें ॥ १ ॥ संतसभा अतिशय वाढली । अमर्याद होत चालली । गणना नाहीं ऐसी झाली । त्या सभेची ॥ २ ॥ असो, ऐसे ज्ञान वाढले । मज मंदमतीस काय कळे । नेति नेति वेद थकले । शद्बज्ञानें ॥ ३ ॥ सहस्त्रमुखी शेष । तोही थके वर्णावयास । मी तों अज्ञान खास । केंवी वर्णू ॥ ४ ॥ नाहीं भक्ति मुख्य देवाची । शद्बज्ञानें

बडवड साची । आयुष्य गेले व्यर्थचि । मायाजाळी ॥ ५ ॥ मनीं कामना धरुन । भक्ति करिती सकळ जन । तैसेची मीही अजाण । करीतसे ॥ ६ ॥ निष्कामत्व मोक्षप्राप्ती । सकामत्वे जन्मप्राप्ती । म्हणून निष्काम कैसी भक्ति । निरुपिजेल ॥ ७ ॥ निष्काम म्हणजे कामनेवीण । शिवाशीं जीव भेटून । जै शिवांतचि होई लीन । तै सुटका ॥ ८ ॥ सुटल्यावरी देव होत । जग सगळें उद्धरीत । जगीं सांभसमान शोभत । शाश्वतरूपे ॥ ९ ॥ सा म्हणिजे 'साहा' गुण । 'भ' म्हणिजे भविष्य जाण । तोडून रेषा फिरवून । घेतली पहा ॥ १० ॥ रेषा फिरण्यास मुख्य कारण । एकनिष्ठ भक्ति जाण । तया भक्तिचे निरसन । सावध ऐका ॥ ११ ॥ 'भ' म्हणती भविष्यास । 'ती' म्हणती हरिमायेस । हरिमायेनें शेवटास । होणार नेलें ॥ १२ ॥ भविष्याच्या शेवट करुन । प्रपंच परमार्थ दोहोंतून मीकाढूपणातें । पार तरले ॥ १३ ॥ या दोहोंमध्यें

बोजा । आत्म्यापरी ठेऊन ओजा । साधकां करीती सहजा । आपणासारिखे ॥ १४ ॥ अथवा बुध मुमुक्षु मंडळी । येऊन मिळती तयांजवळी । तयांसहीं तात्कांळीं । करिती साधु ॥ १५ ॥ अभंग ॥ आपणासारिखें करिती तात्काळ । नाहीं काळवेळ तयांलागीं ॥ १ ॥ ऐंसी युक्ति चालली पाही । जी वर्णितां यें ऐसी नाहीं । दासबोधीं कथिला तोही । दृष्टांत ऐका ॥ १६ ॥ दा. बो. द. १५ स. २ ओवी ॥ २३ ॥ खनाळामध्यें जाऊन राहे । तेथे कोणीच न पाहे सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ १ ॥ खनाळामध्ये राहून । सभा थाटे चालविती पूर्ण । लोकां प्रचित दाखवून । भक्ति वाढविली ॥ १७ ॥ प्रचीत म्हणजे आत्मप्रचीतीं । गुरुप्रचीति शास्त्रप्रचीती । प्रत्येक गोष्टीची प्रचीति । साक्षात्कारें ॥ १८ ॥ साक्षात्कार म्हणजे अक्षात । साहा गुणांचा पालट होत । तई जनांत प्रख्यात । होइजेल ॥ १९ ॥ षड्गुण कैसे पालटावे । कामें

भक्तीस वाढवावे । क्रोधें मायेतें वधावे ।। तरीच साक्षात्कार ।। २० ।। तुकाराम रामदास । करितो गद्यपद्यास । त्यांसि धरूनि भक्तिस । उत्तेजन द्या कीं ।। २१ ।। सगुण ब्रह्माच्या योगें । संभवामी युगे युगे । ऐसे अवतार अवघे । निर्गुण झाले ।। २२ ।। अवतार महत्कृत्यें करिती । भक्ति मार्ग वाढविती । शरणागतांसि रक्षिती । सर्वकाळ ।। २३ ।। दा० बो० द० ७स० १० ओंवी ४० ।। शरणागतांची वाहे चिंता । तो एक सद्‌गुरूदाता । जैसे बाळक वाढवी माता । नाना यत्नें करूनि ।। १ ।। भक्ती वाढण्या कारण एक । बोलणें चालणें दोन्ही एक । समर्थाची प्रतिज्ञा एक । तीही ऐका ।। २४ ।। दशक बारा दासबोधी । समास दहा काढा आधीं । सत्तेचाळीस ओंवी बोधी । तैसेंचि आचारती ।। २५ ।। ओंवी ।। आमुची प्रतिज्ञा आहे ऐशी । कांही न मागणें शिष्यांसी । आपणा मागणें जगदीशासी । भजत जावें ।। १ ।। म्हणून शिष्य

झाले उदंड । परमेश्वरा ख्याती अखंड । हरिरामोशाचें बंड । तेथे कैचें ।। २६ ॥ सभेत वृद्ध तरूण बाळ । पुरुष स्त्रियांदि सकळ । गजरे करिती कल्होळ । एकवटोनी ।। २७ ॥ सभेंत असती पंचाक्षरी । षडक्षरी त्रयोदशाक्षरी । द्वयक्षरी त्र्यक्षरी आणि चतुरक्षरी । तेही असती ।। २८ ।। समर्थास जे निंदिती । तेही अवघे वंदिती । अनुभवार्थ ऐकतां घालती । लोटांगण ॥ २९ ।। आपुला मार्ग त्यजून । उपदेश घ्यावया येती जन । सत्यप्रचीती पावून । आनंदती ।। ३० ।। अतिदूर स्थानीं जे असती । तेही दर्शनालागी येंती । तेणें राष्ट्रीं भरली कीर्ती ! चोहींकडे ।। ३१ ।। साताऱ्याचे कांही येंती । कोल्हापुरासी आहे कीर्ती । हुबळी धारवाड मिती । काय वर्णू ।। ३२ ।। मुंबापुरीत कांही असती । रत्नागिरी पुण्यात ख्याती । बहुत असती कोंकण प्रांती । येती जाती ।। ३३ ।। जमखंडी हें मुख्य स्थान । अनुग्रहीत सर्व सुजाण । लिंगायत आणि ब्राह्मण । बहुत असती ।। ३४ ।। तैसेंचि एक

सोलापूर। त्याहून थोर विजापूर । अनुगृहीत लोक, फार । तया स्थानीं ॥ ३५ ॥ आणिक एक जत संस्थान । त्याहूनि वरीष्ठ । चिम्मड स्थान । भाविक असति चिम्मड जन । भक्तिविषयीं ॥ ३६ ॥ असो ऐशीं असंख्य स्थळें । मज रंकासी काय कळे । यशकीर्तिप्रताप झळाळें । समर्थांचा ॥ ३७ ॥ ऐसे व्हावया कारण । सांगिजेल विस्तारुन । संतांसींच बाणे खूण । अनुभावाची ॥ ३८ । यशकीर्ति विस्तारली । असंभाव्य पसरली । यशकीर्ति प्रताप बोली । ऐका निरसन ॥ ३९ ॥ 'य' म्हणजें इहलोक । 'श' म्हणजे आशा टाक । ऐसे हे समर्थ देख । म्हणोनि लोक धुंडिती ॥ ४० ॥ कीर्ति म्हणजे भगवंतकीर्ति । आपण सर्वदा मुखें गाती समस्तांकडून गावविती । सर्वकाळ ॥ ४१ ॥ भगवंत-कीर्ति गाजवितां । साधुकीर्ति होते तत्वतां । हें सांगा-वया नको आतां । परी सांगितलें ॥ ४२ ॥ प्रताप म्हणजे

परताप । परताप ह्मणजे जनताप । सोशिल्या होतो प्रताप । एरव्ही नाही ॥ ४३ ॥ ऐशी कीर्ति समर्थाची । फेरी चुकते चौऱ्यांशीची । दृष्टांत वाणीं तुकारामाची । तीही ऐका ॥ ४४ ॥ अभंग ॥ नरदेहा यावें हरिदास व्हावें । तेणे चुकवावे गर्भवास ॥ १ ॥ ऐशा शर्तीवरी समर्थ । आश्रम पावले गृहस्थ । क्रियाकर्म वरिष्ठ । सकळामध्ये ॥ ४५ ॥ समर्थ नरदेह पावले । सत्य ब्राह्मण गुरु केले । ब्राह्मण कोणासि ह्मणितलें । तेंहीं ऐका ॥ ४६ ॥ ब्रह्म जानाति ब्राह्मण: । हे वर्म जानती गोसावी । इतरां होय गाथा गोवी । अंजणेवीण जाणती केवीं । गुप्त धन ॥ ४७ ॥ निंदक जरी शरण आला । अनुग्रह देती त्याला ॥ गुह्यार्थ सांगूनि सन्मार्गाला । लाविती सदा ॥ ४८ ॥ तेणें चुकविली फेरी । त्यासी न दिसे यमनगरी ॥ आपण तरूनि लोक तारी । धन्य ते साधु ॥ ४९ ॥ ज्योतीस ज्योत मिळोन जाते । ब्रह्मपदीं ऐक होतें ॥

तेव्हा एकटी कुडी पडते । पृथ्वीवरी ॥ ५० ॥ जैसें आत्मज्ञान जीर्ण । तैसाचि मार्ग पुरातन । संभवामि युगे युगे ह्मणून । अवतार होती ॥ ५१ ॥ निंदक जरी पुण्यवंत । तरी यमाच्या जाचीं पडत । ऐसें लिहण्या आधार मिळत । ह्मणून लिहिलें ॥ ५२ ॥ जे या मार्गी चालले । ते जन्ममृत्यूपासून सुटले । इतर ते अवघे बुडाले । निंदितां निंदिता ॥ ५३ ॥ लिहूं नये परी लिहिलें । निंदकांस दूषियलें । तींहीं सत्य पाहिजे शोधिले । ह्मणोनियां ॥ ५४ ॥ अभंग ॥ रेडा बोले भिंत चाले । महिमा ज्ञानदेवाची ॥ १ ॥ आतां याची प्रचीत । चित्त देऊन ऐका समस्त । एकोनियां यांतील भावार्थ । समजून घ्यावा ॥ ५५ ॥ 'रेडा' म्हणजे अज्ञानाकडून । 'बोले' म्हणजे वेद बोलावून । ज्ञान्यास लज्जा आणून । भक्तिमार्गी ओढिती ॥ ५६ ॥ 'भी' ह्मणजे भीती । 'ती' ह्मणजे त्रिगुण जगती । जगीं त्रिगुणांची भीति

सर्वदा असे ॥ ५७ ॥ 'मही' म्हणजे भूमीवरी । त्रिगुणा भिऊनि चाले अंतरीं । तई महिमा चढल्या-वरी । ज्ञानदेवचि तो ॥ ५८ ॥ दृष्टापुढे 'ज्ञान' पाहिले । तैं साक्षात् 'देव' चि झाले । ह्मणून ज्ञानदेव ह्मणितले । पृथ्वीवरी ॥ ५९ ॥ ऐसे समर्थ ज्ञानदेव झाले । गुह्य तेची प्रगटविले । सर्व विश्व ब्रह्म केले । धन्य धन्य साधु ॥ ६० ॥ आता हंस परमहंस यांचे । लक्षग करितों उभयतांचें । एकाग्रमनें ऐका साचे । श्रोते जन ॥ ६१ ॥ हंस लक्षण प्रपंचात । हौस धरुनि राहत । प्रपंचीं परमार्थ करीत । आणि अंतरीं मुक्त ॥ ६२ ॥ प्रवृत्ति मार्ग स्वीकारिती आणि समुदाय वाढविती । मुक्त होऊनि मुक्त करिती । साधकजनां ॥ ६३ ॥ हंस राहे ससारीं । परी भार ठेवी देवावरीं । जैसा बाळ खेळे अधांतरीं । ताताधरे ॥ ६४ ॥ परमहंस केवल परमार्थी । अनन्यांसि उपदेशिती । निवृत्तिमार्ग स्वीकारिती । प्रवृती सांडुनि ॥ ६५ ॥

हंसा आणि परमहंसा । एकचि पदवी दोघां पुरुषां । किंचित् भेद तोही सहसा । न समजे ॥ ६६ ॥ आता मुक्तिचें लक्षमण । विशद दावुं बोलून । तेंचि आंता सावधान । श्रोती परिसावें ॥ ६७ ॥ गुरूवांचुन नाहीं मुक्ती । ऐसें सांगितलें सिद्धांती आतां नामधारकांची स्थिती । बोलीजेल ॥ ३८ ॥ नामधारक आणि नेमस्त । गुरुवचनीं विश्वास धरीत । आचार बळें शोभत । अंती मुक्त होय ॥ ६९ ॥ वासनाक्षय ह्मणजे मुक्ती । ऐसे सर्वत्र म्हणती । परी ऐशिया नामधारकाची गति । वेगळीच असे ॥ ७० ॥ दा० बो० ॥ जेचि क्षणी अनुग्रह झाला । तेचि क्षणीं मोक्ष झाला । बंधन कांही आत्म्याला । बोलोंचि नयें ॥ १ ॥ अभ्यासें घेंती आत्मदर्शन । मी आत्मा अनुभवती पूर्ण । विश्व ब्रम्ह जाणती जाण । ते जीवन्मुक्त होती ॥ ७१ ॥ अंती मुक्ति आणि जीवन्मुक्ति । यात महदंतर निश्चितीं । म्हणून अभ्यासे स्वरूपस्थिती । अनुभवावी ॥ ७२ ॥

याचि देहीं याचि डोळा। घ्यावा मुक्तिचा सोहळा। स्वरूप न पाहतां बावळा। नामधारक होय ।। ७३ ।। आपणां नको साधन । नाममात्रें मुक्त झालों जाण । ऐसे मनी दृढ धरुन । साधन चुकविती ॥ ७४ ॥ प्रपंचभीति उडेना । काम क्रोधासि जिंकवेना । अनिर्वाच्य आनंद सापडेना । साधनावाचुनीं ।। ७५ ।। साधन नसतां विषयजाळीं । नामधारक सांपडे तात्काळीं । अभ्यासें खणून वासनामुळी । ह्मणून काढावी ॥ ७६ ॥ जो नामधारक आचारभ्रष्ट । तो समजावा योगभ्रष्ट । गुरूवचन सांगतो स्पष्ट । मुक्तीस न पावे ।। ७७ ।। गुरूसी पुनःशरण रिघावे । तरीच त्याने मुक्तीस जावे। गुरू नसता लागें यावे । पुनः संसारासी ॥ ७८ ।। योगभ्रष्ट जन्म पावती । मानव-कुळी जन्म घेतीं। परी लक्ष चौऱ्यांशीची गती। चुकोन जाते ॥ ७९ ।। मानव जाहल्यावरी । ज्ञानमार्ग सांपडे झडकरी । प्रयत्न होताची करीं । मोक्ष येतो

॥ ८० ॥ एतद्विषयीं सद्गुरुवचन । एकचि असें प्रमाण । ग्रंथाहून साभिमान । गुरूवचनीं धरावा ॥ ८१ ॥ शंका धरुन बैसला । अर्थी अनर्थ पै केला । मग ग्रंथ तो तुह्मांला । काय करील ॥ ८२ ॥ अभंग ॥ मातापिता दोन्ही जीवेंची मारावे । चरण वंदावे बायकोचे ॥ १ ॥ या अभंगी होतां अनर्थ । अनर्थामध्ये आहे अर्थ । अर्थ आणि अनर्थ । पाहावा तैसा ॥ ८३ ॥ सुलट अर्थ सर्वा समजे । उलट आत्मज्ञानी उमजे । आम्ही आत्मज्ञानीं शोधिजे । जनाविरुद्ध ॥ ८४ ॥ कळतां कळतां कळों येतो । शोधितां शोधितां शोध लागतो । वळतां वळतां वळूं लागतो । गुह्य अर्थ ॥ ८५ ॥ 'माता' तेचि हरिमाया । 'पिता' अकहांर राया । आत्मबोध–शस्त्रे उभया । जीवेंचि मारी ॥ ८६ ॥ 'बा' म्हणिजे संबोधन । 'एक' म्हणिजे वस्तुरूप जाण । तयाचे वंदावे चरण । दर्शनाउपरी ॥ ८७ ॥ परी तो आत्मा कैसा आहे । आणि कैसेनि लाहे । तेंचो आतां स्वभावें ।

निरूपिजेल ॥ ८८ ॥ आत्मा द्रष्टव्य म्हणुन एक । श्रोतव्य नाम दुजें देख । मंतव्य तिसरे चौथें आणिक । निदिध्यासितव्य ॥ ८९ ॥ आत्मा द्रष्टव्य आत्मा पाहाणें । आत्मा श्रोतव्य श्रवण करणें । मंतव्य म्हणिजे मनीं विचारणें । सर्व कांहीं ॥ ९० ॥ निदिध्यासितव्य म्हणजे ध्यानीं । रूप अभ्यासें प्रगटें नयनीं । मग ते जनीं आणि मनीं । सर्वदा दिसें ॥ ९१ ॥ ध्यान करुन रूप पाहाणें । उगमा जातां जन्म नेणें । ऐशी आशा धरुन राहाणें । मनामध्यें ॥ ९२ ॥ श्लोक ॥ नभासारखें रूप या राघवाचें । मनीं चिंतितां मूळ तुटे भवाचें ॥ याहून सुलभ कबीरवचन । मुढा वाटे तेंहि गहन । श्रोतीं वाचावें देऊन मन । पुढें आहे ॥ ९३ ॥ वचन ॥ देखो तो खसखस मूरीद मरे तो बसवस ॥ १ ॥ ऐंसेचि एक कानडींत । तेही दिधलें आहे येथ । सुलभ जाणा अतिशयित । साधकांसी ॥ ९४ ॥ वाक्य ॥ कुरहुकंडरे मरळि भववके बरलारि ॥ १ ॥

ऐसे आधार असूनी । कोणी खरे न मानिती जनीं ।
म्हणून चमत्कार मनीं । मानिती साधु ।। ९५ ।।
म्हणूनि सत्य मार्ग धरुन । असत्यपंथ द्या टाकून
भगवद्भजन वाढवून । कीर्ती उरवा ।। ९६ ।।
सांप्रदायाचा गौरव केला । आणि ज्ञानमार्गंही
सांगितला । क्षमा कीजें अर्भकाला । अज्ञान जरी
।। ९७ ।। अथवा क्षमेचें नाही कारण । समर्थकृपें
लिहिलें पूणे । समर्थकरींची मी लेखण । म्हणून क्षमा
नलगे ।। ९८ ।। जैसे समर्थ लिहिती । तैसीच लेखणी
चाले ती । दोष मजकडें नच येती । तिळमात्र ।। ९९ ।।
ऐशा ग्रंथाचा कर्ता । तो एक सद्गुरुदाता । गणपति
अज्ञान आहे तत्वतां । दासानुदास ।। १०० ।। इति
श्री ज्ञाननिरुपणं नाम पंचमः समासः

पुंडलीक वरदा हरि विठ्ठल !

जयजय भाऊराव राज सद्गुरु । पदकमली नमित असे दास श्रीगुरु । धृ० ॥ कवि गणपती-रचित ग्रंथ येथें पातला । मंदमती परी मजसी मान हा दिला ॥ त्वां दिधल्या बुद्धीनें म्यांहि पाहिला । शुद्धाशुद्धी । बुद्धी । परि करुनि । करीं लिहुनी । पदि नमुनी । धाडि पामरु ॥ जयजयजय ॥ १ ॥ फेरफार गुर्वाज्ञें अल्प जाहला । शब्दान्वय जनघाटीं कांहीं घातला । मम शिरीं तव छत्रकृपा म्हणुनि संपला ॥ भक्ती । उक्ती । युक्ती । मजजवळीं । नाहीं मुळी । भवजाळीं । बुडत श्रीगुरु । जय० ॥ २ ॥ जठरानळ-काजें या दिवस लागले । म्हणुनि क्षमा मागाया पद्य निर्मिले । पद्य-पुष्प चरणांबुजि आजि वाहिलें । तारी । वारी । सारी । मद्भीती । सौख्यतती । मागे अति । पंचनदिकरू ॥ जयजय० ॥ ३ ॥



ॐ

# श्री समर्थ अंबुराव महाराज यांचे

## संक्षिप्त चरित्र.

### सहावा समास

---

ॐ नमो सद्‌गुरूवरा । आत्मतेज प्रभाकरा । सुमन मम विकसित करा । आत्मदेवा ॥ १ ॥ श्रीसमर्थ भाऊराव । अमित त्यांचा शिष्यसमुदाव । विराजत त्यांत अंबुराव । उडुगणीं जेवि चंद्रमा ॥ २ ॥ वेष असत तो बावळा । परि अंतरीं अध्यात्मकळा । भक्तिभावाचा जिव्हाळा ॥ विलक्षणचि वसतसे ॥ ३ ॥ जयास सद्‌गुरू हाचि देव । सद्‌गुरूपदीं दृढतम भाव । सद्‌गुरुसि समर्पुनी सर्व । अनन्यपणें राहात ॥ ४ ॥ मति जयाची अतिप्रखर । नीतिनेमही खडतर ।

भगवंताचा साक्षात्कार । दिव्य जयासी जाहला ।। ५ ।। जो कृपेचा सागर । विनयभावाचे आगर । ना शिवे जया अहकार स्वप्नांतही कदापि।।६।।प्रेमाची जो प्रेमळ मूर्ती अचल नेमाची प्रतिकृति । जयाचेनी भक्तिस्फूर्ति । अभाविकाही होतसे ।। ७ ।। जेणे परमार्थ साधन । आमरण केले जाण । भगवंतावीण एक क्षण । वाया न ज्यांनीं दवडिला ।। ८ ।। ऐसा आमुचा स्वामिराव । बाबा तयाचे प्रिय नांव । ज्याच्या तपे भक्ति भाव । उपजला अभाविकांसही ।। ९ ।। जिगजिन्नी जगज्जयिनी जाण । केली बाबानीं जन्म घेऊन । करणिकांचे कुलपावन । त्यांच्या दिव्य जीवनें ।। १० ।। बापुराव चुलत्यावरती । निंबरगीनाथांची अति प्रीति । तन्निरूपणीं वाचती पोथी । निंबरगीतचि राहती । ।। ११ ।। बालपणीं निंबरगीस असतां । बाबा भेटत निंबरगीनाथा । नाथ नित्य त्या साखर देता । सक्रीमुत्या त्या ह्मणती ।। १२ ।। सक्रीमुत्याचें दिव्य दर्शन । न घडे तें दिनी शिक्षा पूर्ण। जें दिनी घडे पुण्य दर्शन । शिक्षक प्रसन्न

ते समयीं ॥ १३ ॥ ऐसा अलौकिक अनुभव । बालकाचा वाढवी भाव । श्रीबाबांना ही ते देव । तेव्हांपासून वाटत ॥ १४ ॥ यथाकाळीं लग्न जाहलें । तरुण बावा आनंदले । इंचगिरीस सकुटुंब राहिले । करणिकवृत्ति करूनिया ॥ १५ ॥ **निंवरगीमहाराज** इंचगेरींत । एकदा कुलकर्ण्यांच्या घरीं उतरत । सारी रात्र साधना बसत । आश्चर्य बाबांना वाटले ॥ १६ ॥ त्यांनी त्रिवार विचारणा केली । खोकल्यानें बसण्याची वेळ आली । 'इन्नायित्तप्पा' म्हणोनि । सकाळी हुल्याळाप्रति ते गेले ॥ १७ ॥ कांहीं काळ ऐसा लोटला । आकस्मिक आला यमाचा घाला । कन्या कांता स्वसदनाला । करालकालें खेंचल्या ॥ १८ ॥ पडतां आकाशींचो कुऱ्हाड । उडाली अंतरी गडबड । मति जाहली दिङ् मूढ । क्रांति प्रचंड प्रपंची ॥ १९ ॥ उपजले वैराग्य प्रबळ । गेले गाणगापुर तात्काळ । उपोषण करूनिया सकळ गुरुचरित त्यांनी वाचिलें ॥ २० ॥ तेव्हां तया दृष्टांत झाला । श्रीदत्तांनीं सद्गुरु दाविला । त्याप्रति

## श्री अंबुराव महाराज



जन्म–जिगजिन्नी
१८५६

समाधी – इंचगेरी
२२–१२–१९३३

जाया आदेश दिधला । नंतर बाबा परतले ।।२१।। तेच समयीं निंबरगींत । श्रीभीमरायाचा उत्सव होत । गेले असतां बाबा तेथ । सद्गुरुदर्शन घडे तया ।।२२।। देवळां- पुढील चौथऱ्यावर । बैसले होते उमदीकर । पाहतां त्यांना हेचि गूरुवर । अंबुरायासी वाटले ।। २३ ।। परंतु सादर आणि सभय । बाबांचे ते चित्त होय । जाणोनि संकोच हा राव । देई तमाखू चिमुटभर ।। २४।। येणें भया नष्ट झालें । बाबा समर्थ सन्निध बैसले । वृत्त आपुलें निवेदिले । समर्थचरणी तेधवां ।।२५।। परमार्थाविण दुःख न टळे । नामेंवीण परमार्थ न मिळे । तंव नाम घेई ब भानवळें । ऐसें बोधिले सद्गुरुनीं ।। २६ ।। 'मागुता येईन' ऐसे कथुनि । अंबुराव निघाले तेथोनी । संसार नाश येणें म्हणुनी । नामभय वाटे तया ।२७ जाणोनि बाबांची सुप्तशक्ती ।नाम देण्या उद्युक्त होती। शिष्या करवी धरवून आणिती । समर्थ बाबांस ते समयी ।।२८।। सावळसंग- भाऊराव । गुरुबंधु ते महानुभाव ॥ त्यांना खुणावतीं

गुरुदेव । नाम देण्याकारणें ।।२९।। दिव्यनाम पडतां श्रवणीं । वृत्ति पालटली तत्क्षणीं । नासाग्रीं दृष्टी ठेऊनी । बाबा निघाले नेंम करीत ।। ३० ।। इंचगिरीस बाबा येत । परि नासाग्रीं दृष्टी अविचलित । यापरी सतत नेमांत । एक मास लोटला ।।३१।। झाली नेत्रव्यथा भीकर । तेजरूप दिसतीं अपार । भ्रांत होय साधकवर । घात झालासे म्हणोनिया ।।३२।। सावळसंग ग्रामी पातलें । गुरुसी इतिवृत्त निवेदिलें । म्हणे मज गरीबाचे डोळे । गेले आता काय करूं ।। ३३ ।। गुरूराय हसती तेधवां । जमवून शिष्यांचा मेळावा । सांगोनि नवशिष्याच्या अनुभवा । अनुभवपदें म्हणविती ।।३४।। प्रात :काळी नेमा त्वरित । बाबा जात डोंगरांत ।माध्यान्ह उलटता परतोन येत । ऐंसे निष्ठुर तप केलें ।।३५।। अखंड साधने सिद्धि मिळवी । संसारचिंता सुदूर पळवी । भक्तियोगाचा मार्ग मळवी । मिळवी प्रेम सद्गुरूंचे ।। ३६ ।। तव शेत एक लिलावांत घेंतलें तें भाचा त्यास देत । दोन पोती धान्य त्यांत।

द्यावरी निर्वाह तयाचा ।।३७।। दोहोचें ते तीन झाले। तिन्हीं जागीं सहा पातले । तव एक पोतें बाबानीं दिलें । निंवरगीं सप्ताहानिमित्त ।। ३८ ।। हें पाहोनी समर्थ तोषले । वलूतेदार त्वां मज केले । एसें म्हणोनि आशिर्वादिले । 'ओक्कळि गोम्न' द्यावें बा ।। ३९ ।।अंकुरला जो भाव अमोलिक । आतां यांतचि अमित पीक । देईल तुज जगन्नायक । आशीर्वचन हे सद्गुरूंचें ।। ४० ।। सहाचे मग वारा होत । बारांचें बावीस जमत । पुढें छत्तीसही येत । उणें काय देव देतां ।।४१।। अनंत हस्तें देतां देवें । दोहातीं ते किती घ्यावे । चालवी योगक्षेम तोचि सर्वे चिंता करणें कासया ।:४२।। बाबांनी धंदा सोडिला । केवळ परमार्थ वाढविला । अमित नामप्रेमा जोडला । सेविलास सद्गुरुनिष्ठने ।। ४३ ।। चित्तीं ज्याच्या वसें नाम । करील काय तया काम । परी या मायिकाचा नेम ।प्राणांतींही न धरवे।। ४४।। वैराग्य आणि यौवन । समरस होणे अति कठिण । महद्भाग्ये हें लाभें जाण । सद्गुरुकृपें

बाबांना ।।४५॥ एवं समर्थकृपेचे आश्रित । समर्थसन्निधचि राहात । शंका विचारी सदोदित । चिकित्सक मति तयांची ॥४६।। जाणोनि शिष्याचे मनोगत ।सद्गुरु प्रेमानें उत्तरत॥ निवारूनिया शंका समस्त । करिती सम धान तयाचें ।।४७ यापरी सहावर्षे पर्यंत । बाबा अति वादनिरत । समर्था बेजार करीत । अनावर जिज्ञासा तयाची ।।४८।। शेवटीं एकदां श्रीबाबांनी । आपणा नामाधिकार दिला कोणी ।ऐसे निंबरगी येथें विचारोनी । समर्थांना त्रस्त केलें ।।४९।। सायंकाळी नेमास बैसले । तो दृष्टांती निंबरगीनाथा देखिले बाबांना त्यांनी दटावले । कां रे जीभ त्वां लांब केली।।५०।। भाऊरायास नामाधिकार । म्यां दिधला असे साचार। तुज का त्याचा कारभार । उगाचि साधन करीत जा ।।५१।। तेव्हां सद्गदित अंबुराये । देहभाव समर्था अर्पिला स्वयें । गुरुवाक्य वेदवाक्य होये । मग त्या अनन्य शिष्यासी । ।। ५२ ।। हरपला जंव देहभाव । विलीन गुरुपदी अंबुराव। अनन्यभावे दिव्य अनुभव । लाभला तया तात्काळ ।।५३ ॥

बाबांच्या भावास भुलून। इंचगिरीस मठ स्थापून। सुदाम्याचें घर पावन। समर्थांनी पैं केलें ॥५४॥ वाढला समर्थ शिष्यगण। उभारला मठ तेथेंचि जाण। सप्ताहसमयीं भक्तजन। जमत साधनाकारणे ॥५५॥ क्षेत्र भक्तीचे माहेर झालें। मठाधिकारी बाबास कल्पिले। सप्ते सकळ थाटांत चालले। अविरत सेवेनें तयांच्या ॥ ५६ ॥ देखोनि बावांची सेवाभक्ती। संतोषें समर्थ उद्गारती। तुझी सेवा मीं वानू किती। धन्य धन्य बा अंबुराया ॥५७॥ आला समर्थांचा निर्याणदिन। शिष्यवृंदासि तो दुर्दिन। सर्वत्राना अत्यंत जाण। दुःख झालें तें समयीं ॥ ५८ ॥ समर्थ समधिस्त झाल्यावरी। विन्हळ बाबा अभ्यंतरी। न जाती तें मठा-बाहेरी। साधनीं निरत सर्वदा ॥ ५९ ॥ नाम द्यावया अधिकार। आधींच मिळाला असता थोर। न देई नाम शिष्यवर। तीन वर्षेपर्यंत ॥६०॥ पुढें परमार्थप्रसार। राहिला जाणोनि सत्वर। समर्थ आज्ञेनुसार। नाम द्यावया आरंभिलें ॥६१॥ नंतर दिन पाहून बरा। श्रीबाबा

निघाले जगदुद्धारा । करूनि हरिनामाच्या गजरा । झेंडा रोविला समर्थांचा ॥ ६२ ॥ बाबा गांवोगावीं जात । भक्तमंडळी नेत जेथ । त्रिकाळ निरूपण भजन करींत । उद्धरित भाविकांसी ॥ ६३ ॥ परी आपुलें त्रिकाळसाधन । समर्थापरी न चुककविती जाण । श्री बाबांचे नित्य निरूपण । समर्थांचेंच वाटत ॥ ६४ ॥ तव निरूपण ऐकून निंदकजन । म्हणती शब्द छिन्नभिन्न करून । त्यांचें सौंदर्य हिरावून । कुरूप तयां करताती ॥ ६५ ॥ शब्द केवळ वाहन । अर्थ–वाहक तो जाण । नेणती परी हे कुहकजन । सेविती शिष्य अर्थसत्व ॥ ६६ ॥ शब्दांस करूनि साधन । बाबा वदती स्वानुभवज्ञान । असार सोडून सार जाण । राजहंस चाखती ॥ ६७ ॥ पुढें मठांत द्वैत माजलें । श्री बाबांनी ते स्थान सोडिलें । आपण अलग राहू लागले । वाढवित भक्ति तपोबळें ॥ ६८ ॥ वृत्ति सदैव उदास । न मागती कांहीं कोणांस । भावबळें भगवंतास । भजा ऐसेचि मागत ॥ ६९ ॥ श्री बाबा फिरत अविश्रांत । भक्ति वाढवावया जनांत ।

भक्ता देवुनि आत्मप्रचीत । कृतार्थ त्यांना पै केलें ।।७०।।
पुढें वृद्धापकाळ झाला। न सोसती श्रम शरीराला । देह अत्यंत
क्षीणला । उद्धारकार्य तरी चालें ।।७१।। जंव उदरव्यथेनें देह
पीडिला । तंवहि नेमांत खंड न पडला । विदेहभाव वसे तय
वेळां । नसें व्यथांगही मुखावरी ।।७२।। जाणोनि आपुला
निर्याणदिन । आदेश दिला शिष्यालागोन । नाम मनीं दृढ
धरुन । पथ्य पाळा अविचलित ॥७३॥ नुरली आस मम
किंचित । नारायण नारायण म्हणत । उडून जातों आकाशांत
एसें वदोनी देह ठेंवो ।।७४।। नाम सतत सादर स्मरणें ।
नीतिनियम अखंड पाळणें । सत्संगासी सदैव सेविणें । भोगणें
भगवदानंद ।।७५।। हाचि बाबांचा दंडक । आचरुनि दाविला
तो देख । करुन करवून अनेंक । उद्धारागति पैं नेले ॥७६॥
**श्रीरामरायाच्या** प्रेरणेने । **कृष्ण** सखयाच्या सहाय्याने ।
हार **मनोहर** गुंफी कवनें । अर्पितसे तो श्रीचरणीं ।।७७।।

○ ● ○

# श्री रामभाऊ रानडे यांचे चरित्र

## सातवा समास

### १

ॐनमो जी गुरुदेवा। सच्चिदानंदा चित्सूर्या। आत्म-विद्येच्या आचार्या। मतिप्रकाश मज देई ॥१॥ माझिये हृदयी वसावें। आपुलें दिव्य दर्शन द्यावें। पावन चरित्र वदवावें। मज मतिमंदाकडोनी ॥२॥ जमखंडी पावन परम। होत नूतन क्षेत्रोत्तम। भूमंडळी ख्यात-नाम। नाम-जन्माकारणें ॥३॥ पहिल्या कन्येनंतर जाण। बहुत दिन नसे अपत्यदर्शन। तेणें गुणें दुःख दारुण। पार्वती मातेस होतसे ॥ ४ ॥ रामेश्वराचे उपासन। आणि अखंड नाम स्मरण। अनन्यभावें करी जाण। माता पुत्रापेक्षेनें ॥५॥ तंव तिची तपस्या फळली। पुत्ररत्न-प्राप्ति झाली। माता कृतज्ञतेनें भरली। आनंदाश्रू ढाळत ॥६॥ रामेश्वर चा वरद पुत्र। म्हणोनि नांव रामचंद्र। रानडे कुळ परम पवित्र। त्याच्या जननें जाहले ॥ ७ ॥ धन्य मातेचें उदर। जथे

श्रीगुरुदेव रानडे



जन्म ३-७-१८८६
जमखंडी

समाधी ६-६-१९५७
निंबाळ

अवतरे भक्तवर । जेणें केला लोकोद्धार । भक्ति–प्रेमप्रसारें ।।८।। प्रज्ञा, जिज्ञासा, विवेक । उपजत गुण हे अलौकिक । ह्या गुणें हा बालक । शाळेमध्यें तळपतसे ।।९ ।। श्रीभाऊराव सद्‌गुरु समर्थ । जमखंडीस येत असत । भाविकासी उद्धरित । नाममंत्र देऊनी ।। १० ।। शके अठराशें तेत्रिशी । वैकुंठचतुर्दशीच्या शुभ दिवशी । नामबीज रामचंद्रासीं । श्रीभाऊरायें दीधलें ।।११।। एकदां रामें ऐकलें । सद्‌गुरु सहज जे बोलिले । परीक्षाही नामबळें । उत्तीर्ण होतां येईल ।।१२।। तव शालांत परीक्षा पातली । रामें मनोभावें तयारी केली । उत्तर पत्रिकाही लिहिली । उत्तम प्रकारें तयानें ।।१३।। तव आठवे तया समर्थवचन । करूं लागला नामस्मरण । स्मरणीच्या माळा ओढतसे जाण । नित्य भावें रामचंद्रें ।।१४ ।। पुढ परीक्षेचा निर्णय कळला । क्रमांक दुसरा मिळाला । जगन्नाथ शिष्य–वृत्तीचा । लाभ झाला । सद्‌गुरुकृपे तेधवा १५ ।। सत्वर रामभाऊ पुण्यपुरीस । जात पुढील शिक्षणास । दक्षिण

महाविद्यालय त्यास । विद्या -केंद्र होतसे ।।१६ बुद्धीची चमक अलौकिक । सुशील-सौरभही अमोलिक । संतुष्ट तेणें प्राध्यापक । महाविद्यालयांत त्या ॥ १७॥ अध्ययन आणि नामसाधन। दोन्ही चालिली समसमान ।पारमार्थिक अनुभव जाण । कांही लाभले ते समयीं ।। १८ ।। पुढे एके दिनीं जमखंडीत । श्रीसमर्थ अकस्मात । पोथी वाचण्या आज्ञापीत । तरुण रामरायासी ।।१९ रामभाऊ अती संकोचले । आढेवेढे बहुत घेतलें । परी समर्थांच्या आग्रहामुळें । पोथी त्यांनीं वाचिली ।। २० ।। पोथी-भजन झालियावरी । जवळील शिष्यां खोलीत पाचारी । श्रीसमर्थ तिथें अवसरी । एकांतीं बोलत तयासी ।। २१ ।। निंवरगीनाथांचे नातू । त्या साधकामाजी असतु । त्यांना संबोधूनि समर्थु । भविष्यचि सांगत ते वेळीं ।। २२ ।। अगा तव आजियाची कीर्ति । पसरेल साता सागरा वरती । अखिल भूमंडळा -वरती । तरूणाच्या या तपोबळें ।। २३ ।। याचा अहंभाव जावया । लाविले यास वाचावया । तुम्हांसी आश्चर्य

वाटावया । कारण कांहीं नसेचि ' ।। २४ ।। दिव्य भविष्य ऐकोनि सकळां । आनंद अत्यंतचि जाहला । प्रेमादर त्यांचा दुणावला । रामरायाविषयींचा ।।२५।।

२

पदवीधर झालियावरी । 'फेलो' होऊन सत्वरी । छात्रवर्गा बंधूदरी । प्रेमळपणें वागवी ।। २६।। शेवटीं आचार्य परीक्षेंत । तत्वज्ञान विषय घेत । पहिला क्रमांक मिळवित । कुलपति सुवर्णपदकही ।।२७।। परींक्षितांचे विषयज्ञान । अधिक असें परीक्षकाहून।परीक्षकांची ही प्रशस्ती मिळवून। धन्य धन्य ते जाहले ।। २८ ।। पुढें जाहले अध्यापक । मग होत प्राध्यापक । नंतर ज्ञान–शाखा प्रमुख । शेवटी होत कुलगुरू ।। २९ ।। एवं चढती वा ती पायरी । गुरुकृपे लाभे उत्तरोत्तरी । ऐंहिक वैभावाच्या शिखरीं । विराजत आपुल्या बुद्धीबळें ।। ३० ।। अध्ययनें बुद्धी फुलली । नामसाधनें प्रतिभा फांकली । अंतर्बाह्य पूर्णता लाभली

प्राध्यापकरायातें ॥ ३१ ॥ पूर्णप्रज्ञाच्या अध्यापनें । स्फूर्ति-करणाचे विकिरण । आत्मबुद्धीचें विकसन । विद्यार्थ्यांचें होतसे ॥ ३२ ॥ परगुणपरमाणूचें कौतुक । अत्यंतची करीत देख । आत्मविश्वास पोषक । त्यांचा प्रबोध होतसे ॥३ ॥ केवळ विद्यालयीन शिक्षण । न देत त्या समाधान । या कारणें लोकशिक्षण । देण्या यत्न करीतसे ३४ नव संस्था स्थापिल्या । व्याख्यानमाला गुंफिल्या । दोन पत्रिकाही चालविल्या । ग्रंथ लिहिले अमोलिक ।।३५ ।। बेंगळूरीं 'उपनिषद्रहस्य' । कालिकापुरीं 'वेदान्त रहस्य' नागपुरीं 'गीता रहस्य ' । विशद केलें गुरुरायें ॥ ३६॥ पुढें नागपुरीं भरे तत्वज्ञान परिषद । अलंकारी अध्यक्षपद । आत्मतत्व-दर्शन विशद । केलें आपुल्या भाषणीं ॥३७॥ संस्कृत ऋषिसाहित्यासमवेत । प्राकृत संत-साहित्यही अभ्यासत । संत-संदेशही विवरित । बुद्धिवादास पटेलसा ॥३८ ॥ ग्रंथ रचनाही अमोल । आंग्लभाषेंत झाली सकळ । यांत जागतिक दृष्टी विशाल । गुरूवर्यांची दिसतसे ॥३९ ॥

वैभव आणि विपत्ती । एकासवे एक येती समतेचे धडे देती । वेळोवेळीं गुरुवरा ।। ४० ।। दोन दुर्धर आजार । दोनही महाभीकर । लोळविती मृत्युशय्येवर । बहुत दिन गुरुराया ।। ४१ ।। सद्‌गुरूकृपा प्रबळ । आणि नामनिष्ठाही सबळ । ओढून काढी त्या कराळ। मुखांतुनीं कालाच्या ।। ४२ ।। प्रियजनांचा वियोग । तोही एक दारूण योग । दुखा:नळाची ती आग । हृदया त्यांच्या जाळीत ॥ ४३ ।। आधीं जात प्रियसुत । प्रिय पत्नी पुढे जात । मागती माताही निघत । परधामा जावया ।। ४४ ॥ गुरूवर्य एकाकी जाहले । देवाशींच सख्य वाढविलें । साधननिरत ते झाले । उत्कटतेनें ते समयी ।। ४५ ।। पुढें समर्थ आज्ञेवरूनी । द्वितीय संबंध केला त्यांनीं। सत्वरचि कन्यारत्नीं । गुरुवर्यांनां प्रसादिले ॥ ४६ ।। असो, तीन तपें शिकवून । कुलगुरूपद अलंकारून । जागतिक लौकिक संपादुन । सेवा-निवृत्त ते झाले ।। ४७ ।।

३

जिज्ञासा आणि सुवृत्ती । कामपूर्ति आणि दुःखनिवृति । उत्कट स्मरण आणि सत्संगति । गुरुकृपा साक्षात्कार ॥४८॥ हीं आठ साधनें जाण । परस्पर पोषणें वाढून ॥ गुरूवर्यां चढविती पूर्ण । आत्मदर्शन-शिखरावरी ॥ ४९ ॥ परमार्थ-प्राप्ति आणि प्रसार । हेंचि वाटे जीवनसार । आदर्श हा परम थोर । पूर्वीपासुन त्या प्रेरितसे ॥ ५० ॥ आधि नामसाधन होतें सकाम । तेणें होय पूर्ण काम । वाढलें मग नामप्रेम । उत्कट नेम होतसे ॥ ५१॥ कामप्राप्तीसवें कांही । अनुभवही आले पाही । आश्चर्यानंद ते समई । गुरुवर्यांना होतसे ॥५२॥ तारे बहुरंगी चमकत । शेषांचे वेटोळे दिसत । होत असे अति चकित । नव साधक त्या योगें ॥५३॥ याच समयीं क्षयविकार । बळावला अति दुर्धर । तेणें मृत्यूचेंही महाद्वार । कांही वेळा त्या दाविलें ॥ ५४ ॥ प्रकृतिमान श्रीसमर्था कळविलें । अनन्यभावें शरण गेले ।

कृपा कराया विनविले । सर्वभावें तयासी ।। ५५ ।। तात्काळ पावला समर्थप्रसाद । आणि पत्रद्वारें प्रबोध । त्याच्या सेवेनें व्याधी दुःखद । ओसरली ती हळुहळु ।। ५६ ।। नंतर भेटावया समर्थास । मातेसवें गेले इंचगिरीस । मातेनें निवेदिलें दुःखास ।। समर्थचरणी तेधवा ।। ५७ ।। ऐकूनि मातेचो आर्त मात । बोलत सद्‍गुरु कृपावंत । 'चिंता न करि गे यांत । याची चिंता देव करी ।। ५८ ।। साठ वर्षे रामरायास मरण भय नाहीं खास । मोठें देवकार्य यास । करावयाचें असतसे' ।। ५९ ।। समर्थाच्या या आशीर्वचने । आनंदली उभयतांचीं मनें । सद्‍गुरूसन्निधचि राहूनि । साधननिरत ते झाले। ६० ।। समर्थे मग निरोप निधला । सूचक संदेशही कळविला । अंतःकरणीं उत्तम ठसला । पुढील त्याचा प्रबोध ।। ६१ ।। नेणपणें जालें तें जालें । जालें ते होऊन गेंले । जाणपणें वर्तलें । पाहीजें नेमस्त ।। ६२।। आतां चांगले दिवस पाहाल । सुगंध वार्ताही ऐकाल । आनंद आनंद होत जाईल । भगवंताच्या कृपाबळे ।। ६३ ।।

जंव अवतार कार्य संपले । समर्थ तंव स्वानंदी बुडाले । परी शिष्यवृंदा लोटले । शोक सागरी अपार ॥ ६४ ॥ पुढे बांधले अध्यात्मभुवन । कष्टानें चालविले साधन । नित्य आठ तास नामस्मरण । गुरुआज्ञेनें करीत ते ॥६५॥ भुवनीं असता एक दिन । झालें त्यासी हनुमंतदर्शन । तेज:पूंज तें रूप जाण । साश्चर्य त्यानी पाहीलें ॥ ६६ ॥ या अनुभवा-नंदसवे । देह-व्यथा पुनरपि प्रसवे । नित्यगुरूरायास दुर्दैवे । शीतज्वर ग्रस्त करी । ६७ ॥ आता सद्गुरूविण नाहीं सोय । धरावे त्यांचेच पाय । ऐसा करूनि दृढनिश्चय । गुरूगृही ते पातले ।। ६८ ॥ श्रीबाबा आणि श्रीआक्का । श्रीसमर्थशिष्या अलौकीका । त्यांचे पावन सानिध्य देखा । उत्साहप्रद त्या होई ।।६९।। तेणें त्याचें पारमार्थिक जीवन । उत्कर्ष पावो लागले जाण । अनुभवही नित्य नूतन । लाभले त्या गुरूकृपे ।। ७० ।। एकदा ' नयनाचे नयन ' देखिले । आनंदचे भरते आलें । श्रीबाबांना तें कळविलें । त्यांनांही हर्ष हं तसे ॥ ७१ ॥ पुढे ' नामास नाम ' झालें । हेंही

श्री बाबांना कळविलें । तव 'घट्ट धरावे नामचि पहिले ।' सानंद बाबा सांगत ॥ ७४ ॥ पाहून हा अनुभव अनुपम । श्री बाबा सांगत देण्या नाम । परी रुद्रशांनीं विनयें परम । पायिकपण चालविले :। ७५ ॥ एके दिनी ध्यानस्थ असतां । समर्थांचे शब्द कानी पडत । 'ते फूल घे ' ऐसें सांगत । तंव जागृत होई गुरुवर ॥७६॥ नित्याप्रमाणें समाधीस गेले । तेथे ताजें फूल एक पाहिलें । स्वप्नांतील फूलचि जाणिलें । घेतलें तें गुरुराये ॥७७॥ पुढें फूल तें वाळवलें । निश्चय अल्पसे सेविलें । दिव्यौषधें त्या सुधारले । प्रकृतिमान तयांचें ॥७८॥ प्रकृति सत्वर पूर्ववत् झाली । भातभाकरी पचू लागली । अनुभवांतही वाढ जाहली । आनंद तया होतसे ॥७९॥ पुनरपि कोणी एके दिनीं । बैसले होते ते ध्यानीं । त्यासमयी गुरुवरांनी । धिप्पाड पुरुष पाहिला ॥८०॥ निवरगीनाथांचा शिष्य सतेज । मुद्रा त्याची तेज:पुंज । निंबाळास गेलें महाराज । ऐसे त्यानें सांगितलें ॥८१॥ तव गुरुराय तया विचारती । 'तेथेही वाढणार

॥ श्री राम ॥

मागा जालें निरुपण । सातवे भक्तीचें लक्षण । आतां ऐंका सावधान । आठवी भक्ती ॥ १ ॥ देवासी परम सख्य करावे । प्रेमप्रीतीनें बांधावे । आठवे भक्तीचें जाणावे । लक्षण ऐंसे ॥ २ ॥ देवास जयाची अत्यंत प्रींती । आपण वर्तावे तेणें रीती । येणेंकरिता भगवंती । सख्य घडें नेमस्त ॥ ३ ॥ भक्ती भाव आणि भजन । निरूपण आणि कथाकीर्तन । प्रेमळ भक्तांचे गायन । आवडें देवा ॥ ४ ॥ आपण तैसेचि वर्तावे । आपणासि तेंच आवडावे । मनासारखे होता स्वभावे । सख्य घडे नेमस्त ॥ ५ ॥ देवाच्या सख्यत्वाकारणें । आपले सौख्य सोडून देणें । अनन्यभावे जीवे प्राणें । शरीर तेही वेचावे ॥ ६ ॥ सांडुन आपुली संसारव्यथा । करीत जावी देवाची चिंता । निरूपण कीर्तन कथा वार्ता । देवाच्याचि सांगाव्या ॥ ७ ॥ देवाच्या सख्यत्वा

सुगंधी श्रीगुरुदेवास । समर्थकृपें लाभली ।। ८९ ।।
सहकाऱ्यांशी मतभेद झाले । गुरुदेवें त्यागपत्र दिधलें । पुढें
प्रयागाहून आमंत्रण आलें । स्वीकारलें ते गुरूदेवें ।। ९० ।।
विश्वविद्यालयाचें विशाल क्षेत्र ।प्राध्यापकाचे काम स्वतंत्र ।
परिसरही परम पवित्र । परमार्थानुकूल लाभला ।।९१।।
प्रकृतीस प्रयाग मानत ।साधनही उत्तम चालत ।अनुभव सा
भरती येत । स्वानंदी रत सर्वदा ।।९२।। जेथ उज्ज्वल
अनुभव येत । तेथ वारंवार नेमा जात । ऐसी स्थळें अनेक
पुनीत । प्रयागपरिसरीं त्या केलीं ।। ९३।। ऐसें एक स्थळ
सुंदर ।। होतें द्रौपदी घाटावर । खरीदून ते गुरुवर । निवास
विशाल बांधित ।। ९४ ।। प्रतीवर्षी उन्हाळयांत । गुरुदेव
निंबाळां येत । तंव भक्तगण तेथे जमत । त्यांच्या सन्निध
रहावया ।। ९५।। नाम द्यावया अधिकार । आधींच लाभला
होता थोर ।परी मुमूक्षूना गुरुवर ।श्रीबाबांच्याकडेंच धाडत
।९६॥ श्रीबाबांच्या निर्याणानंतर । समर्थ प्रेरणेनुसार ।।
परीक्षून ते भक्तवरां । नाम देऊं लागले ९७ ।। परी नाम

देण्याची पद्धत । होतीं विलक्षण किंचित । दोघा काकांच्या मार्फत । नाम देत गुरुदेव ॥ ९८ । आत्मारविंद्र उमळला आमंत्रण मिळे अलिकुळाला । भाविक-वृंदतेथे धाडला । बोध्र- मकरंद सेवावया ॥९९॥ झालियावरी सेवानिवृत्त । निंबाळी गुरुदेव राहत । कांही काळ प्रयागांत । प्रतिवर्षी काढीत । १०० ।श्रीगुरुदेवांची 'बैठक' । असे अत्यंत अलौकिक ॥ बोधरत्नें तव अमोलिक । भाविकांना लाभत ॥१०१॥ होत मंडळी अति तल्लीन । न राहे वेळेचे भान । तासाचें तास जाण । केव्हां जात न कळे ॥१०२॥ ध्यानी जंव तल्लीन होत 'नारायण' ॥ 'नारायण' ऐसे गर्जत । भावारूढ गुरुदेव दिसत । दिव्यतेजयुक्त भाविकां ॥१०३॥ न कळे दिवस कीं राती । अखंड लागलीसे ज्योती ।आनंद-लहरीची त्यांची गति । अवर्णनीय असतसे ।। १०४ कधीं आनंदलहरीवर डोलत । कधीं शांतिसागरीं विश्रमत । परी निजस्थिती कळो न देत ॥ सामान्यापरी वागुनी ॥ १०५ ॥ जीवन त्यांचे आत्मरत । आत्मप्रेरित, आत्मभरित ॥

आत्मानंदे उन्मत्त ध्यानी । सदैव विलसती ॥ १०६ ॥ गुरुदेव मायेवीण माहेर । विश्रांतीचें निजसार । त्यांचें अभय आणि आश्रय थोर । भक्ता सदैव लाभत ॥१०७॥ श्रीचा अमृतमहोत्सव । जन्मस्थळी झाला अपूर्व । जमखंडीकराचें सुदैव । फळा आले ते समयी ॥१०८॥ तीन दिवस होत उत्सव । गुरुदेवांचा गुणगौरव । नामसप्ताहही अपूर्व । रामतीर्थी जाहला १०९ ॥ उत्सव समाप्त जाहल्यावर । गुरुदेव राहिले महिनाभर परमार्थ–प्रेमास आला बहार। श्रीच्या दिव्य सान्निध्यें ॥११०॥ गुरुदेव निंबाळा परतले । सत्वरचि प्रयागा गेले । काही दिन आनंदे राहिले । स्वसदनी तेथल्या ॥ १११ पुढें वादळ जाहलें थोर । वीज पडे जवळील घरावर । शीत बाधे त्यांना फार । कफाने छाती दाटली ॥११२॥ किंचित बरें वाटल्यावर । परतले निंबाळा गुरूवर । आणिले केवळ अस्थिपंजर । शरीराचे तेधवा ॥११३ " मौतका डंका " वाजला । ऐसे कळलें गुरुदेवांना । कफातिरेकें घसा बसला । बोलता नये ते वेळी

॥ ११४ ॥ शेवटचे पांच दिवस न शिवती अन्नोदकास । परी कळो न देती अन्य कोणास । आपुल्या कटुंबावाचुनी ॥ ११५ ॥ निर्वाण दिनीही नेमास गेले । गुरुगृहपथ न्याहाळोनी आले । कटुंबास खुणेनें कळविलें आपण जाणार म्हणोनीं ॥११६॥ रात्रीचें भजन झालें । आरतीचें तेंज निमालें । आंत शांतपणें तये वेळे । ज्योतींत ज्योत मिळतसे ॥११७॥ श्रीगुरुदेव महाथोर । चालता बोलता चमत्कार । मरणास मारून तें अमर । आत्मरूपीं निमाले ॥११८॥ देवाकडून आले । तें देवाकडेच गेले । धन्य झाले धन्य केले । धन्य धन्य श्रीगुरुदेव ॥११९॥

५

श्री गुरुदेवांचा परमार्थ–सोपान । पांच पायऱ्यांचा असे जाण । त्याचा पाया मानवी मन । त्यावरी तो उभा असे ॥ १२० ॥ भाव, बुद्धि, इच्छाशक्ति । आणि प्रतिभा

तयांचिया माथी । ही चार अंगे असतीं । मानव- मनाची शाश्वत ॥१२१॥ परमार्थ-प्रेरणेंने भाव जागृती । सद्‌गुण-सेवने नीतिशक्ती । आत्मज्ञाने बौद्धिक शांती । ध्याने प्रतिभा विकसन ॥१२२॥ चारही परस्पर-पोषक । परस्पर साहाय्यें वाढत । सर्वांचा परिणति आत्मदर्शनात । अंती स्वानूभवें होतसे ॥ १२३ ॥ एवं विवेकयुक्त नीतिप्रधान । भावयुक्त नामस्मरण पूर्ण । आत्मसाक्षात्कार- संपन्न। भक्तियोग श्रीगुरुदेवांचा ॥१२४॥ एवं 'श्रीगुरुदेव-चरितामृतसार' गुरुदेव-प्रेरणेनें रचित मनोहर । याच्या सेवनें भाविक थोर । आत्मानंदी रंगीत ॥ १२५ ॥ आतां विश्वात्मकें देवे । येणें वाग्यज्ञें तोषावे । तोषोनि मज द्यावें । पसायदान ॥१२६॥



दासबोध : दशक ४ था: समास ३

# नामस्मरण भक्ति

॥ श्रीराम ॥

मागां निरोपिलें किर्तन । जे सकळांस करी पावन । आतां ऐका विष्णो:स्मरण । तिसरी भक्ती ॥ १ ॥ स्मरण देवाचें करावे । अखंड नाम जपत जावें । नामस्मरणें पावावे । समाधान ॥ २ ॥ निश्य नेम प्रात:काळीं । माध्यानकाळीं सायंकाळीं । नामस्मरण सर्वकाळीं करीत जावे ॥ ३ ॥ सुखदु:खउद्वेग चिंता । अथवा आनंदरूप असतां नामस्मरनेंविण सर्वथा । राहोंच नये ॥ ४ ॥ हरुषकाळीं विषमकाळीं । पर्वकाळीं प्रस्तावकाळीं ॥ विश्रांतिकाळीं निद्राकाळीं । नामस्मरण करावें ॥ ५ ॥ कोडें सांकडे संकट । नाना संसार खटापट

आवस्था लागता चटपट । नामस्मरण करावे ।। ६ ।। चालतां बोलतां धंदा करितां । खातां जेवितां सुखी होता । नाना उपभोग भोगितां । नाम विसरों नयें ।।७।। संपत्ती अथवा विपत्ती । जैसी पडेल काळगती । नामस्मरणाची स्थिती । सांडू च नये ।। ८ ।। वैभव सामर्थ्य आणि सत्ता । नाना पदार्थं चाखता । उत्कट भाग्यश्री भोगिता । नामस्मण सोडु नये ।। ९ ।। आधी अवदसा मग दसा । अथवा दसेउपरी अवदसा । प्रसंग असो भलतासा । परंतु नाम सोडूं नयें ।। १० ।। नामें संकटे नासतीं । नामें विघ्नें निवारती । नामस्मरणें पाविजेती । उत्तम पदे ।। ११ ।। भूत पिशाच्च नाना छंद । ब्रह्मगिऱ्हो ब्राह्मणसमंध । मंत्रचळ नाना खेद । नामनिष्ठें नासती ।। १२ ।। नामें विषबाधा हरती । नामें चेडे चेटकें नासती । नामें होय उत्तम गती । अंतकाळीं ।। १३ ।। बाळपणीं तारुण्यकाळी । कठीणकाळीं वृद्धाप्य– काळी । सर्वकाळीं अंतःकाळीं । नामस्मरण असावें ।। १४ ।।

नामाचा महिमा जाणें शंकर। जना उपदेशी विश्वेश्वर। वाराणशी मुक्तिक्षेत्र। रामनामेकरुनी ॥ १५ ॥ उफराटया नामासाठी। वाल्मिक तरला उठाउठीं। भविष्य वदला शतकोटी। चरित्र रघुनाथाचे ॥ १६ ॥ हरिनामें प्रल्हाद तरला। नाना आघातांपासून सुटला। नारायणनामे पावन जाला। अजामेळ ॥ १७ ॥ नामें पाषाण तरले। असंख्यात भक्त उद्धरले। महापापी तेचि झाले। परम पवित्र ॥ १८ ॥ परमेश्वराचीं अनंत नामे। स्मरतां तरिजे नित्यनेमें। नामस्मरण करिता येमें। बाधिजेना ॥ १९ ॥ सहस्र नामामधें कोणीयेंक। ह्मणतां होतसे सार्थक। नाम स्मरता पुण्यश्लोक। होईजे स्वये ॥ २० ॥ कांहीच न करुनि प्राणी। रामनाम जपे वाणी। तेणे संतुष्ट चक्रपाणी। भक्तालागी सांभाळी ॥ २१ ॥ नाम स्मरे निरंतर। ते जाणावें पुण्यशरीर। महादोषांचे गिरिवर। राम नामें नासती ॥ २२ ॥ अगाध महिमा न वचे वदला। नामें बहुत जन

उद्धरला । हळहळापासून सुटला । प्रत्यक्ष चंद्रमौळी ॥ २३ ॥ चहुं वर्णा नामधिकार । नामीं नाहीं लहान-थोर । जड मूढ पैल पार । पावती नामें ॥ २४ ॥ ह्मणोन नाम अखंड स्मरावें । रूप मनीं आठवावें । तिसरी भक्ति स्वभावें । निरोपिली ॥ २५ ॥

इति श्रीदासबोधे गुरुशिष्य संवादें
नामस्मरण भक्तिनाम समास तिसरा ॥



॥ श्री राम ॥

मागा जालें निरुपण । सातवे भक्तीचें लक्षण । आतां ऐंका सावधान । आठवी भक्ती ॥ १ ॥ देवासी परम सख्य करावे । प्रेमप्रीतीनें बांधावे । आठवे भक्तीचें जाणावे । लक्षण ऐंसे ॥ २ ॥ देवास जयाची अत्यंत प्रींती । आपण वर्तावे तेणें रीती । येणेंकरिता भगवंती । सख्य घडें नेमस्त ॥ ३ ॥ भक्ती भाव आणि भजन । निरूपण आणि कथाकीर्तन । प्रेमळ भक्तांचे गायन । आवडें देवा ॥ ४ ॥ आपण तैसेचि वर्तावे । आपणासि तेंच आवडावे । मनासारखे होता स्वभावे । सख्य घडे नेमस्त ॥ ५ ॥ देवाच्या सख्यत्वाकारणें । आपले सौख्य सोडून देणें । अनन्यभावे जीवे प्राणें । शरीर तेही वेचावे ॥ ६ ॥ सांडुन आपुली संसारव्यथा । करीत जावी देवाची चिंता । निरूपण कीर्तन कथा वार्ता । देवाच्यांचि सांगाव्या ॥ ७ ॥ देवाच्या सख्यत्वा

साठीं । पडाल्या जिवलगांसी तुटी । सर्वं अर्पावें शेवटीं । प्राण तोहि वेंचावा ॥ ८ ॥ आपुलें आवघेंचि जावें । परी देवासीं सख्य राहावे । ऐसी प्रीती जीवें भावें । भगवंती लागावी ॥ ९ ॥ देव म्हणिजे आपुला प्राण । प्राणासि न करावें निर्वाण । परम प्रीतीचें लक्षण । ते हे ऐसे असें ॥ १० ॥ ऐसे परम सख्य धरिता । देवास लागे भक्तांची चिंता । पांडव लाखाजोहरीं जळतां । विवरद्वारें काढिले ॥ ११ ॥ देव सख्यत्व राहे आपणासी । तें तों वर्म आपणाचि पासीं । आपण वचनें बोलावीं जैसीं । तैसीं येती पडसादें ॥ १२ आपण असतां अनन्यभावें । देव तात्काळचि पावे । आपण त्रास घेतां जीवें । देवहि त्रासे ॥ १३ ॥ श्लोक ।। ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ॥ जैसे जयाचें भजन । तैसाचि देवही आपण । म्हणोन हें आवघें जाण । आपणांचि पासीं ॥ १४ ॥ आपुल्या

मनासारिखे न घडे । तेणें गुणें निष्ठा मोडे । तरी गोष्टी आपणाकडे । सहजचि आली ॥१५॥ मेघ चातकावरी वोळेना । तरी चातक पालटेना । चंद्र वेळेसि उगवेना । तरी चकोर अनन्य ॥१६॥ ऐसे असावे सख्यत्व । विवेकें धरावे सत्व । भगवंता–वरील ममत्व । सांडूचि नयें ॥१७॥ सखा मानावा भगवंत । माता पिता गणगोत । विद्या लक्ष्मी धन वित्त । सकळ परमात्मा ॥१८॥ देवावेगळें कोणी नाहीं । ऐसे बोलती सर्वही । परंतु त्यांची निष्ठा कांही । तैसीच नसे ॥१९॥ म्हणोनि ऐसे न करावे । सख्य तरी खरेंचि करावे । अंतरी सदृढ धरावे । परमेश्वरासी ॥२०॥ आपुलिया मनोगताकारणें । देवावरी क्रोधास येणें । ऐसी नव्हेत ही लक्षणें । सख्यभक्तीचीं ॥२१॥ देवाचें जे मनोगत । तेंचि आपुलें उचित । इच्छेसाठीं भगवंत । अंतरूं नये कीं ॥२२॥ देवाचे इच्छेने वर्तावे । देव करील तें

मानावे । मग सहजचि स्वभावे । कृपाळू देव ॥२३॥ पाह्मातां देवाचे कृपेसी । मातेची कृपा कायेंसी । माता वधी वाळकासी । विपत्तिकाळीं ॥ २४ ॥ देवें भक्त कोण वधिला । कधी देखिला ना ऐकिला । शरणा- गतांस देव जाला । वज्रपंजरू ॥ २५ ॥ देव भक्तांचा कैंवारी । देव पतितांसि तारी । देव होये साह्याकारी । अनाथांचा ॥ २६ ॥ देव अनाथांचा कैंपक्षी । नाना संकटांपासून रक्षी । धांवन्निला अंतरसाक्षी । गजेंद्रां- कारणें ॥ २७ ॥ देव कृपेचा सागरु । देव करुणेचा जळधरु । देवासि भक्तांचा विसरु । पडणार नाहीं ॥ २८ ॥ देव प्रीती राखों जाणे । देवासी करावें साजणें । जिवलगें आवधीं पिसुणें । कामा न येती ॥ २९ ॥ सख्य देवाचे तुटेना । प्रिती देवाची क्टिेना । देव कदा पालटेना । शरणागतांसी ॥ ३० ॥ ह्मणोनि सख्य देवांसी करावें । हितगुज तयांसी सांगावे आठवे भक्तीचें जाणावें । लक्षण ऐसे ॥ ३१ ॥ जैसा

देव तैसा गुरु । शास्त्री बोलिला हा विचारु । म्हणौन सख्यत्वाचा प्रकारु । सद्गुरूसीं असावा ।। ३२ ।।
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सख्य भक्तिनिरूपणं नाम समास आठवा.



श्रीरामदासांचे

# ।। मनाचे श्लोक ।।

श्रीराम

गणाधीश जो ईश सर्वा गुणांचा ।
मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।
नमुं शारदा मूळ चत्वार वाचा
गमूं पंथ आनंत या राघवाचा ।। १ ।।

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावे ।
तरी श्रीहरीं पाविजेतो स्वभावे ।
जनीं निंद्य तें सर्व सोडोनि द्यावे ।
जनीं वंद्य तें सर्व भावे करावें ॥ २ ॥

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।
पुढें वैखरीं राम आधीं वदावा ।
सदाचार हा थोर सांडू नये तो ।
जनी तोचि तो मानवी धन्य होतो ॥ ३ ॥

मना वासना दुष्ट कामा नये रे ।
मना सर्वथा पापबुद्धि नको रे ।
मना धर्मता नीति सोडू नको हो ।
मना अंतरी सार वीचार राहो ॥ ४ ॥

मना पाप संकल्प सोडूनि द्यावा ।
मना सत्यसंकल्प जीवीं धरावा ।

मना कल्पना ते नको विषयांचीं।
विकारे घडे हो जनीं सर्व ची चीं ॥ ५ ॥

नको रे मना क्रोध हा खेदकारी।
नको रे मना काम नाना विकारी।
नको रे मना सर्वदा अंगीकारू।
नको रे मना मत्छरू दंभ भारू ॥६॥

मना श्रेष्ठ धारिष्ठ जीवीं धरावें।
मना बोलणें नीच सोसीत जावें।
स्वये सर्वदा नम्र वाचे वदावे।
मना सर्व लोकांसि रे नीववावे ॥७॥

देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी।
मना सज्जना हेचि क्रिया धरावी।
मना चंदनाचे परी त्वां झिजावे।
परी अंतरीं सज्जना नीववावें ॥८॥

नको रे मना द्रव्य ते पूढिलांचे ।
अती स्वार्थवुद्धी न रे पाप सांचे ।
घडे भोगणें पाप तें कर्म खोटे ।
न होतां मनासारिखे दुःख मोठे ॥ ९ ॥

सदा सर्वदा प्रीति रामीं धरावी
दुखाची स्वयें सांडि जीवीं करावी ।
देहेदुःख हें सूख मानीत जावें ।
विवेकें सदा स्वस्वरूपीं भरावें ॥१०॥



## अकॅडमी ऑफ कंपेरेटिव्ह फिलॉसॉफी अँन्ड रिलीजन बेळगाव.

बेळगांव येथील राणी पार्वतीदेवी कॉलेजला लागूनच सांगलीचे राजेसाहेब, श्रीमंत चिंतामणराव आप्पा-साहेब पटवर्धन यांची खासगी जमीन होती. त्यापैकी कांही भाग कॉलेजचे क्रीडांगणाकरिता मिळावा म्हणून कॉलेजच्या व्यवस्थापक मंडळाने १९४९ साली श्रीमंत राजेसाहेबांच्या-कडें विनंती केली. पण या सर्व जमिनीबद्दल कांही तांत्रिक बांधा असल्यानें श्रीमंत राजेसाहेबांनी जमीन आपल्या मालकीची नाहीं असें कळविलें. याच सुमारास श्री जगन्नाथराव परुळेकर यांची अलिबागहून चिकोडी विभागाचे प्रांत ऑफिसर म्हणून बदली झाली आणि त्यांचेकडून ही जमीन श्रीमंत राजेसाहेबांच्या खासगी मालकीची आहे असे कॉलेजच्या चालक मंडळाला कळलें. नंतर ही सर्व मंडळी श्रीमंत राजसाहेबांना सांगली येथे

प्रत्यक्ष भेटली आणि श्रीमंतानी याबाबतीत विचार करून कळवितो असे श्री परुळेकराना सांगितलें. त्याचवेळीं श्री. गुरुदेव रानडे यांचा मुक्काम ,सांगली येथे राजेसाहेबांच्या माळ बंगल्यावरच होता. श्री. परुळेकर यांची व श्री. गुरु-देवांची भेट झाली आणि श्री. गुरुदेवांनी श्री. परुळेकर यांचेवर अनुग्रह केला, त्यांना नाममंत्र दिला आणि नंतर श्री परुळेकरानी सांगली सोडली.

पुढे महिनाभरांतच श्रीमंत राजेसाहेबांनी तारेने श्री. परुळेकर याना भेटीस बोलाविलें. कै. बाबुराव ठाकूर, श्री वसंतराव हेरवाडकर वगैरे कॉलेजची चालकमंडळीही त्यांचेबरोबर सांगलीस गेली. तेथे राजेसाहेबांच्याबरोबर चर्चा होऊन जमीनीचे बाबतीचा बांधा नाहीसा करण्याचे श्री. परुळेकर यानी श्रीमंत राजेसाहेबांचेकडे मान्य केले. नंतर लगेच कॉलेजकरतां अजमासे चार एकर जमीन राजेसाहेबांनी देणगीं म्हणून दिली. त्याच सर्व्हे नंबरपैकीं

आणखी उरलेली जवळजवळ १२ एकर जमीन काय करू असा प्रश्न श्रीमंत राजेसाहेबांनी केला. ही जमीन श्रीगुरुदेव रानडे यानां देण्यात यावी असें श्री. परूळेकर यानी सुचविले आणि ही विनंती मान्य करून श्री. राजेसाहेबानीं ती जमीन श्री. गुरूदेवांना दिली. त्याप्रमाणे बेळगावच्या कलेक्टरना आक्टोबर १९५० मध्ये कळविण्यात आले.

पुढें मार्च १९५२ मध्यें श्रीमंत राजेंसाहेबानीं बेळगाव येथे या देणगीबद्दल जरूर ते कागदपत्र नोंद करून दिले. नंतर लगेच श्री गुरूदेवानीं या जमिनीबद्दल एक सार्वजनिक **विश्वस्थनिधी** ( Public Trust ) नोंद करून, त्या संस्थेस "अकॅडेंमी ऑफ कंपॅरेटिव्ह फिलॉसॉफी अन्ड रिलीजन, बेळगांव" असे नांव दिलें. आपण स्वत: त्या संस्थेचें ट्रस्टी झाले आणि संस्थेंचें ध्येय व उद्देशही त्यानींच खालील प्रमाणें ठरवून टाकले.

(A) To work for the spiritual unity of

mankind and consequent peace and good-will upon earth, bringing together intellectual and spiritual ...minded persons through (1) spiritual, symposiums (2) study and research, (3) Lectures, (4) Meeting and conferences and (5) Religious and philosophical publications.

श्री. गुरूदेवांचें इतर कार्यामूळे आणि प्रकृतीही इतकीशी चांगली नसल्यामुळे त्यांचे हयातींत या संस्थें-कडून कांहीं कार्य झाले नाहीं. तारीख ६-६-१९५७ रोजी श्री. गुरुदेवांचे निर्याण झाले त्यांनंतर श्रीमंत राजे-साहेबांच्या सल्यानें बेळगांव येंथील डिस्ट्रिक्ट जज्ज यांचे कडे नवीन, ट्रस्टी नेमण्याकरतां अर्ज करणेंत आला आणि डिस्ट्रिक्ट जज्जानीं, १) श्री गणपतराव उर्फ काकासाहेब तुळपुळे, २) कृष्णराव उर्फ बाबासाहेब संगोराम, ३) श्री विठ्ठलराव जमखंडी, ४) श्री.जगन्नाथराव परुळेकर व श्री के आर रानडें, या पांच जणांना ट्रस्टी म्हणून नेमले.

१९६२ नंतर हा हुकुम झाला. त्यानंतर लगेच सांगली येथें श्रीमंत राजेंसाहेबांचे वाड्यावरच या ट्रस्टीची पहिली सभा झाली आणि श्रीमंतांचे सुचनेवरून श्री. तुळपुळे यांना चेअरमन व श्री. परुळेकर याना सेक्रेटरी नेमण्यात आले.

या ट्रस्टनीं त्यानंतर कामास लगेच सुरवात केली. एप्रिल १९६४ मध्ये " गुरुदेव मंदिर " या इमारतीचा पाया नामदार बी. डी. जत्ती (भारताचे भूतपूर्व उपाध्यक्ष) यांच्या हस्ते घालण्यात आला. इमारत पूर्ण झाल्यावर तारीख ८-१२-१९६५ रोजी त्यावेळचे भारताचे अध्यक्ष कै. डॉ. एस्. राधाकृष्णन् यांच्या हस्ते इमारतीचे उद्घाटन झालें. या भव्य व सुंदर इमारतीमध्ये गुरुदेवांच्या पादुकांची स्थापना केली आहे. साधकांच्याकरता राहण्यास खोल्या आहेत आणि प्रवचनें, व्याख्याने, कीर्तनें वगैरे कार्यक्रमाकरता मोठा हॉलही आहे. संस्थेच्या उद्देशास अनुसरुन लगेच १९६६ साली " पाथवे टु गॉड " (Pathway to God)

## श्री गुरुदेव महाराज यांच्या पादुका
## बेळगांव



हे इंग्रजी नियत कालिक सुरु करण्यांत आले. आता ते त्रैमासिक ह्मणून निघत आहे. श्रीं. गुरुदेवांच्या स्मरणार्थ एक वार्षिक व्याख्यानमालाही सुरु करण्यात आली आहे. त्या मालेतील व्याख्यात्याला अनुदान मिळते आणि ही व्याख्याने ग्रंथरुपाने प्रसिद्ध केली जातात. वेळोवेळीं परी-संवादही घडवून आणले जातात आणि त्यावेळी वाचलेंले निबंधही छापून प्रसिद्ध केले जातात. याशिवाय वेळोवेळीं प्रवचनें वगैरे कार्यक्रमही होत असतात. आतापर्यंत या संस्थेंने ३२ पुस्तके प्रसिद्ध केली आहेत. वाचकवर्गाकरता एका ग्रंथालयाची व्यवस्था असून तेथें आता जवळ जवळ दहाहजार ग्रंथ उपलब्ध आहेत. प्रतिवर्षी वैकुंठचतुर्दशीस नामसप्ताहही साजरा होत असतो. त्याच प्रमाणें दरवर्षी श्री गुरुदेवांची पुण्यतिर्थ ही साजरी केली जाते, प्रसंगा-नुसार इतर पारमार्थीक कार्यक्रमही होत असतात.

शंभर रुपये एकदम भरुन, " पाथवे टु गॉड " चें

कायम वर्गणीदार असे आजमितीस १३० जण झाले आहेत. त्यांना आता विनावर्गणी हे त्रैमासिक मिळते. प्रत्येकी ३०० रु. देऊन या संस्थेचे तहहयात (Life member) असे आजमितीस १०१ सभासद झाले आहेत; त्यांना संस्थेंचे त्रैमासिक विनावर्गणी मिळून दरवर्षी प्रसिद्ध होणारी पुस्तकेंही विनामूल्य मिळतात. शिवाय ५०० रु. हून अधिक रक्कम देणगीरुपानें देऊन आश्रय दाते (Donor) असलेल्यांची संख्या ७५ आहे. त्याना तहहयात सभासदाप्रमाणें सर्व सवलती मिळतातच आणि त्याशिवाय त्यांच्यातर्फे ट्रस्टी म्हणून एक इसम निवडला जावून, तो व्यवस्थापनामध्येही भाग घेत असतो. किरकोळ देणगी देणाऱ्यांची संख्याही चांगलीच आहे. अशा रीतीनें जनतेकडून सहकार्य मिळत आहे आणि संस्थेच्या उद्देशास अनुसरून हळू हळू कार्य वाढत चालले आहे.

श्री. काकासाहेब तुळपुळे यांच्यासारख्या श्रेष्ठ

साधकांच्या मार्गदर्शनाखाली संस्थेंचे कार्य पहिल्यापासूनच व्यवस्थितपणें चालू होते. परंतु त्यांच्या प्रकृतीच्या अनानुकूलतेमुळे ते या कार्यातून १९७७ साली निवृत्त झाले. व त्यांचे मे १९८२ साली निधन झाले. त्यानंतर श्री बाबासाहेब संगोराम यांची अध्यक्ष पदी निवड झाली. नोव्हेंबर १९८३ मध्ये त्यांचेही निधन झाले व आता श्री जगन्नाथराव परुळेकर हे या संस्थेचें अध्यक्ष आहेत, आणि त्यांचे मार्गदर्शनाखाली काम चालू आहे.

या संस्थेंमार्फत आपल्या पारमार्थिक तत्त्वज्ञानाचा प्रसार सर्व जगभर होईल असे श्री. गुरुदेव ह्मणत असत साक्षात्कारी संतांचे शद्ब यथाकाल खरे होणारच, अशा धारणेनुसार संस्थेंचे कार्य चालू आहे.

हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥
न लगे मुक्ती धनसंपदा । संतसंग दे गा सदा ॥
तुका म्हणे गर्भवासी । सुखे घालावे आम्हासी ॥

# शुद्धिपत्रक (ठळक)

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| भाग २ | | | |
| १५ | १४ | सुरमरा | सुरवरा |
| ५५ | ११ | नभ्रभावा | नम्रभावा |
| ६० | ११ | सभ्दावित | सद्भवित |
| ६२ | ४ | व्याळकू | व्याकूळ |
| ६८ | १४ | जुपती | जुत्पती |
| ७५ | २ | म्हली जात | म्हटली जात |
| १०० | १५ | इच्छहार | इच्छाहार |
| ११० | ४ | श्र्ठ | श्रेष्ठ |
| ११२ | १६ | मी काढू पणाते | मी पणाते काढून |
| ११३ | २ | वुध | वद्ध |
| १२९ | १५ | सावळसंर | सावळसंग |
| १३७ | १३ | पुढ परीक्ष | पुढे परीक्षेचा |
| १४१ | ८ | पनी | पत्नी |
| १४३ | १६ | आतंद | आनंदी |
| १४५ | ३ | रवरानी | गुरुवरानी |
| १५२ | ८ | नामस्सरण | नामस्मरण |

# आमचीं कांही प्रकाशनें